मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# निर्मितीची तळमळ




महान मुत्सद्दी ज्याप्रमाणे शांततेच्या काळांत घरें बांधतात नवीन प्रगतीची आस लागलेल्या जागृत राष्ट्रास महाराष्ट्र निर्माण करण्याची आकांक्षा असते. आज दुसरी पंचवार्षिक योजना चालू आहे आणि आपल्या विविध विकास योजना पूर्ण करण्यांत भारत गुंतला आहे. योजनेखाली नेमून दिलेला आपला वांटा पूर्ण करण्याचे प्रयत्न करून, मुंबई राज्य राष्ट्राच्या प्रगतीतील आपली भूमिका पार पाडीत आहे.

राज्यांच्या द्वितीय पंचवार्षिक योजनेंत प्रस्तावित असलेल्या रु. ३५०.२८ कोटी एकूण खर्चापैकी, १९५६ ते १९५९ पर्यंतच्या पहिल्या तीन वर्षांत रु. १६७.२६ कोटी खर्च करण्यांत आले. १९५९–६० मधील तरतूद रु. ९०.१८ कोटी आहे.

पहिल्या ३ वर्षांत अन्नधान्यांचें उत्पादन सुमारें ३.३६ लक्ष टनांनी वाढलें. १९५०–५१ मधील परिस्थितीशी तुलना केल्यास, सुमारें २०,००० जास्त प्राथमिक शाळा बांधण्यांत आल्या, माध्यमिक शाळांत सुमारें १,००० नें वाढ झाली व योजनेच्या तिसऱ्या वर्षाच्या अखेरीस उच्च शिक्षणासाठी असलेल्या संस्थांची संख्या सुमारें दुप्पट झाली असें आढळून येईल.

३,७२९ मैल लांबीच्या सडका बांधण्यांत आल्या, १०४ नवीन पूल व कॉजवेज बांधण्यात आले, औद्योगिक कामगारांसाठी १३,१९२ घरें बांधण्यांत आली, (१९५९–६० मध्ये आणखी ७,००० घरें बांधून पूर्ण होतील अशी अपेक्षा आहे) कमी उत्पन्नाच्या लोकांसाठी ४,१६० घरें बांधण्यांत आली.

योजनेच्या कार्यक्रमानुसार पाटबंधारे, विद्युत्, औद्योगिक
व इतर योजनांत झपाट्यानें प्रगति होत आहे.

**मुंबई राज्याची आगेकूच**

FAMDEAL DIRECPUB

अनुक्रमणिका

# दीपावली

सा हि त्य
क ला
सं स्कृ ति

वर्ष १६ वें
एप्रिल १९६०

## श्रेयनामावलि

*कथा :*

● अरविंद गोखले—तिपेडी ● पुरुषोत्तम धाक्रस—पोपट ● सदानंद रेगे—अटळ ● गोपालकृष्णन्—अद्‌भुत कल्पद्रुमी ● डी. बी. धांडे, डे. सुपरिटेंडेंट ऑफ पोलिस—लक्ष्मीसाठीं लक्ष्मीचा खून.

*काव्य :*

● सदानंद रेगे ● एकू ● पुष्पा त्रिलोकेकर ● मधुकर केचे

*ललित लेख :*

● ज्ञानेश्वर नाडकर्णी—फ्रान्सिस न्यूटन सूझा ● वसंत सबनीस—जिथें नेपोलियन हरला ! ● पु. भा. भावे—चुंबन चर्चा ● गोपाळकृष्ण भोबे—भारताचें शक्तिस्थान

*प्रवासवर्णन :*

● अनंत काणेकर—हॉंगकॉंग जुने आणि नवें

*वैचारिक लेख :*

● न. र. फाटक—ऐतिहासिक लोकभ्रम ● डॉ. टी. आर. नरवणे—कोण म्हणतो दारुबंदी अयशस्वी झाली ? ● गांधी-गंगा ● जीवन साधना ● महा भारत कालीन पंचमहापातकांतील एक—मद्यपान ● माननीय व्यक्ति ● शेवटचें पान ● पान पूरकें वगैरे.



दलाल आर्ट स्टुडिओ . ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

[illegible] प्रकाशक : [illegible]ी. दीननाथ दलाल. दलाल आर्ट स्टुडिओ ४०-४२ कनेडी मुं[illegible] नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. [illegible] रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक अंकासह रु. १२॥ या अंकांत प्रसिद्ध [illegible]लेली मतें चालकांचीं अधि[illegible] मतें असतात[illegible] हीं. या मासिकांतील [illegible]त चित्रें व ले[illegible]वरील [illegible] दलाल आर्ट स्टुडिओ[illegible]

अनुक्रमणिका

संस्कृतीचीं प्रतीकें : १२

**महारुद्र हनुमान**

मनोजवं मारुततुल्यवेगं
जितेन्द्रियं बुद्धिमतां वरिष्ठम्
वातात्मजं वानरयूथमुख्यं
श्रीरामदूतं शरणं प्रपद्ये

मनावाऱ्याऐसी झेप वेगवान। इंद्रियें जिंकून वरकोटी
असा ज्ञानवंत पूत वारियाचा। वानर वीरांचा गगराव.
दूत [illegible]चा शोभे हनुमान। असो लोटांगण त्याच्यापायीं

-मधुकर केचे



चैत्र शके १८८१ एप्रिल १९६०



# भारताचें शक्तिस्थान

" सौमित्रा, सुग्रीवाचा सचीव असलेला हा वानरराज त्याच्या लहानशाच, परंतु अर्थपूर्ण संभाषणावरून अत्यंत बुद्धिमान् वाटतो. ऋग्वेद आणि यजुर्वेद यांचा त्यानें चांगलाच अभ्यास केला असला पाहिजे. याच्या अत्यंत गोड वाणीवरून आणि जें त्याला सांगायचें होतें, त्यांतल्या प्रत्येक वाक्याचा स्वर, लय आणि शब्दोच्चारांवरून सामवेदांत तर हा निपूण वाटतो. ज्या राजाजवळ असा दूत असेल, त्या राजाचे सर्व मनोरथ पूर्ण होतील. शत्रू देखील याच्या या मिष्ठास वाणीवर लुब्ध होतील. म्हणून हे लक्ष्मणा, याच्याशीं स्नेहपूर्ण आणि तितक्याच मधुर वाणीनें संभाषण कर ! " असे उद्‌गार सुग्रीवाचा निरोप घेऊन आलेल्या हनुमंताला उद्देशून, श्रीरामाने लक्ष्मणाजवळ काढले. यानंतर राम-लक्ष्मणाशीं झालेल्या पहिल्याच भेटींत, आपलीं कांहीं वैशिष्ट्यें सांगतांना आरंभींच सुग्रीव सांगतो, " रघुनंदना. माझ्या मंत्रीमंडळांतील सर्वश्रेष्ठ, अतिशय बुद्धिमान आणि बलाढ्य, ज्याला सर्व सिद्धि वश आहेत, शिवाय जो एकनिष्ठ असून स्वामिनिष्ठहि आहे अशा या हनुमतानें मला तुझी सर्व हकिकत सांगितली. "

मारुतीच्या योग्यतेविषयींचीं वरील दोन वर्णनें वाल्मिकी रामायणांतल्या किष्किंधाकांडांत प्रथमदर्शनींच सांपडतात. वालीचा वध झाल्यावर त्याच्या तारा आणि इतर पत्न्यांनीं अपार शोक केला. त्याप्रसंगीं विकल झालेल्या सुग्रीवाने त्यांचें सांत्वन करायची विनंति, प्रथम हनुमंतालाच केली. हनुमंतानें शोक आवरण्यासाठीं तारेला केलेला उपदेश आणि संसार असार असल्याचें त्यानें केलेलें निरूपण, प्रगल्भ आहे. राज्य मिळाल्यानंतर स्वेच्छाचारी झालेला सुग्रीव, रामाला दिलेलें वचन विसरला, परंतु योग्य वेळींच त्याला सावध करण्याकरितां आलेला मारुती, कठोर नव्हे; पण मर्यादितहि नव्हे असें जें जागृत करणारें सुंदर भाषण करतो त्याला तोड नाहीं. राजानें कोणत्या वचनाला कसें जपलें पाहिजे याबद्दल त्यानें केलेले विवेचन मुद्देसूद तसेंच मार्मिक आहे.

सीतेच्या शोधासाठीं प्रस्थान करणाऱ्या शेंकडों पराक्रमी वानरांत सुग्रीवाचा सर्व भार होता तो हनुमंतावरच. त्या सर्वांसमोर उपदेशपर भाषण केल्यावर हनुमंताचा हात धरून त्याला श्रीरामाजवळ नेऊन सुग्रीव म्हणतो, " रामचंद्रा, अंतरिक्ष पृथ्वी किंवा समुद्र या तिन्ही ठिकाणीं विहार करण्याची या महाकपीची गति सारखीच वेगवान आहे. नीतिशास्त्राचा हा पंडित असून, देशकाल परिस्थितीचें तसेंच भूत, भविष्य, वर्तमानाचें याला संपूर्ण ज्ञान आहे. आणि म्हणूनच माझा सारा विश्वास याच्यावरच आहे.

सुग्रीवाची ती हनुमंत स्तुति ऐकून श्रीराम प्रसन्न झाले. मारुतीला त्यांनीं जवळ बोलावलें, त्याला कडकडून आलिंगन दिलें, व खुणेसाठीं त्याच्या हातीं आपली मुद्रिका देऊन ते म्हणाले, " कपिश्रेष्ठा माझें बरंचसं कार्य तुझ्या हातून पूर्ण होईल यांत संदेह नाहीं. जा तुला माझा पूर्ण आशीर्वाद आहे. "

असा हा भीमरूपी वज्रदेही महारुद्र, विनयीही तेवढाच होता. सीतेचा शोध लावून परत आल्यावर, सर्व वानरांनीं किष्किंधेला परततांना अमाप उत्साहाच्या भरांत, मधुवनांत धुडगूस घातला; परंतु हा वानरश्रेष्ठ मात्र एका बाजूला एकांतांत आपल्या स्वामीची करुणा भाकीत उभा होता. आपण केलेला अचाट पराक्रम स्वतःच्याच मुखांतून श्रीरामाला कसा सांगावा, याची त्याला विवंचना पडली होती. भावार्थ रामायणांत एकनाथांनीं अशा प्रसंगीं त्यांच्या तोंडांत सुंदर ओंव्या घातलेल्या आहेत. या वेळीं श्रीरामाचे पाय आठवून स्वतःला अत्यंत लहान समजून मारुती म्हणतो—

> धांव पाव गा श्रीरामा । माझा अपराध करीं क्षमा ।
> पडिलों संकटीं दुर्गमा । सर्वोत्तमा पाव वेगें ॥
> मीं तुझें निज बाळक । ज्ञान मूढ अति उत्संक ।
> क्षमा करोनि सकळीक । कृपा आवश्यक करीं मज ॥

शेवटीं ब्रह्मदेवानें त्याची ती अडचण निवारली. ताडपत्रावर हा सर्व इतिहास लिहून स्वहस्तुरीनें त्यांनीं रामाकडे द्यायला तो मजकूर मारुतीकडे दिला. रामदर्शनानंतर दिव्यमण्यांबरोबर ब्रह्मदेवाचें तें पत्र मारुतीनें श्रीरामांना दिलें; परंतु स्वतःच्या मुखांतून एक अक्षरहि सांगितलें नाहीं. आपला थोडाहि पराक्रम स्वतःच्या तोंडानें न सांगणारा इतका विनयी अवतार सबंध पुराणांत आणिक दुसरा नाहीं.



अनुक्रमणिका

मारुतीच्या जन्माविषयीं अनेक कथा प्रचलीत आहेत; परंतु केसरी वानराच्या अंजनी नांवाच्या पत्नीनें कैक संवत्सरपर्यंत तपश्चर्या करून महादेवाला प्रसन्न करून घेतलें आणि त्याच्या वरप्रभावानें तिला जो पुत्र झाला तोच हा हनुमंत. त्यांतहि एक जोड कथा अशी कीं दशरथ राजानें जो पुत्रकामेष्टि यज्ञ केला त्या यज्ञांतून निघालेल्या प्रसादरुपी पायसाचे त्यानें तीन अविर्भाग केले. त्यांतला एक अविर्भाग घारीनें पळवला आणि तो घेऊन पळतांना तिच्या हातांतून गळून पडून दैवयोगानें नेमका तो अंजनीच्या ओंजळीत पडला. तो शिवाचाच प्रसाद असें समजून अंजनीनें भक्षण केला. त्यापासून तिला झालेल्या पुत्रावर मरुतहि आपला हक्क सांगूं लागला. आपणच घारीच्या हातून प्रसाद पाडायची कीमया केली असें मरुताचें म्हणणें. असो !

देवांच्या वरप्रभावानें अंजनीचा हा पुत्र, परमप्रतापी, तसाच वज्रदेही झाला. श्री रामचंद्रानें त्याला चिरंजीव केलें. सप्त चिरंजीवांतला तो एक, मोक्षदायक.

द्विवेदी नांवाचे एक उत्तर हिंदुस्थानी शास्त्री. मारुतीचा जन्म ‘ स्वीडन ’ येथें झालेला आहे, असें वाल्मिकी रामायणाचा आधार घेऊन स्वच्छ लिहितात. शम्बसादन म्हणजे स्वीडन, हरिणक्षेत्र म्हणजे हॉर्न यमकोटिपत्तन = आष्ट्रेलिया, उमानदी = ओबी, मंगल = मगोलिया, सूरसेन = शायबेरीया वगैरे वगैरे नामसादृष्यांतल्या जुळवलेल्या नामावळी देऊन तें सिद्ध करायचा त्यानीं प्रयत्न केलेला आहे; परंतु तो हास्यास्पद वाटतो. कारण सुग्रीवानें सीतेच्या शोधार्थ पाठवलेल्या वानरश्रेष्ठांत ज्यांना ज्यांना ज्या ज्या दिशेची चांगलीं चांगली माहिती होती त्यांना त्यांना त्या त्या दिशेला पाठवलें.

पूर्वेकडे यूथपति नांवाच्या बलाढ्य वानराला ससैन्य पाठवला. सुषेण, अर्चिष्मान्, अर्चिर्माल्य या वानरांना पश्चिमेकडे पाठवलें. शतबळीला उत्तरेकडे पाठवलें आणि हनुमान, अंगद, नील, जाम्बवान्, सुहोत्र आदि बलाढ्य वानरानां दक्षिणेकडे पाठवलें. मारुती जर स्वीडनमधून इथें आला असता तर त्याला तिथल्या देशांची अधिक माहिती असल्यानें सीतेच्या शोधार्थ तिथें पाठवलें असतें. सुग्रीवानें त्याला दक्षिणेकडेच कां पाठवलें ?

यावनी सत्तेच्या काळांत दीन हीन अनाथ झालेल्या महाराष्ट्राला चैतन्य प्राप्त करून देण्यासाठीं समर्थ रामदासस्वामींनी सांप्रदायाप्रमाणें अकरा मारुतींची स्थापन करून शक्तीची उपासना करायला शिकविलें. पुढें समर्थ शिष्यांनी त्याच सांप्रदायाचा फार मोठा प्रचार केला. कुठें आखाड्याच्या रुपानें तर कुठें लहान मोठ्या देवळांच्या रुपानें महाराष्ट्रभर झपाट्यानें त्याचा प्रचार झाला. आणि एकापरीनें हितकारी अशा या देवांचें वैभव वाढलें.

मारुती हा महान् गायक होता, [illegible] नारद आणि तुंबरु यांच्यांत परास्परांच्या श्रेष्ठतेविषयीं [illegible] उत्पन्न झाला आणि तो विकोपाला गेला. मध्यस्ती करणाऱ्या श्रीविष्णूनीं त्यांना मारुतीची भेट घ्यायला सांगितलें. मारुतीच्या दर्शनासाठीं आलेल्या त्या उभयतांना दूरूनच असा एक स्वर ऐकूं येऊं लागला, कीं त्या स्वरांतला एकनाद कुठल्याहि वाद्यांतला नव्हता. तो जीवमात्राचा म्हणावा तर जीवमात्राला एवढा दमश्वास कुठून असणार ! आणि इतका मधूर स्वर गायनाच्या ज्ञानाशिवाय येणें मुष्कील. दोघेहि आपसांतलें भांडण विसरून त्या स्वराच्या रोखानें झपाट्यानें निघाले. जवळ जाऊन त्यांनीं पाहिलें तों खुद्द मारुतिराय शङ्जांत तल्लीन होऊन बसले होते.

—गोपाळकृष्ण भोबे

---

**नवी “ हिशाबनीति ”**




काटेकोर न्याय !

अनंत काणेकर

कम्युनिस्टांच्या राज्यांत सामान्य चिनी माणसाला संबंध दिवसांत जेमतेम दोन औंस तांदळांचा भात खाऊन कसें तरी जगावें लागतें. वर आणखी सरकार सांगेल तें काम निमूटपणें करावें लागतें—

# हाँगकाँग

## नवें आणि जुने



हाँगकाँग मधील एक रस्ता

**१ जून १९५५**

हाँगकाँगमधल्या एक दोन चिनी मित्रांना श्री. प्रभाकर पाध्ये यांनी पत्रें दिलीं होतीं. त्यांना भेटायला प्रातरुपाहानंतर सकाळीं १० वाजतां बाहेर पडलों. कावलूनच्या दूरच्या टोकाला एकाला भेटण्याकरतां गेलों, पण ते परदेशी गेल्याचें कळलें. ग्रॅन्व्हिल् रोडवर रहाणारे प्रोफेसर शिट्-चेन्-पिंग यांच्याकडे दुपारी सव्वाबाराच्या सुमारास पोहोचलों. सुदैवानें तें घरीं होते. दारावरची घंटा वाजवली तेव्हां एक वृद्ध चिनी नोकर बाहेर आला. शिट्चें नांव घेतले तेव्हां खुणेनें तो हो म्हणाला; आणि दार उघडून मला त्यानें आंत घेतलें. हंसऱ्या चेहेऱ्याचा हा चिनी म्हातारा फारच आतिथ्यशील होता. खूप खालीं मान लववून त्यानें मला आंत येण्याची खूण केली; आणि दिवाणखान्यांतल्या कोचावर बसायला सांगून क्रेव्हन् ए सिगारेटचा डबा आणि काड्यांची पेटी पुढ्यांत ठेवली. धांवतच तो कोपऱ्याकडे गेला, आणि कांचेच्या खुज्यांतलें थंडगार पाणी एका ग्लासांत ओतून त्यानें माझ्या पुढ्यांत आणून ठेवलें. इतकें सर्व केल्यावर तो आंत गेला. थोड्याच वेळांत शिट् बाहेर आले. मी भेटायला आल्याबद्दल त्यांनी मनःपूर्वक आनंद व्यक्त केला. आज दुपारचें जेवण तुम्ही इथेंच केलें पाहिजे, बोटीवर जायचें नाहीं, असें म्हणून त्यांनी आग्रहानें मला जेवायला ठेवून घेतलें. पूर्वी कॅन्टनमधल्या अमेरिकन विद्यापीठांत राज्यशास्त्राचे प्राध्यापक असलेले आणि पाहुणे प्राध्यापक म्हणून कांहीं महिने दिल्ली विद्यापीठांत काम केलेले डॉ. वू जेवायला यायचे होते. त्यांना यायला अर्धा पाऊणतास होता. तोंपर्यंत आम्ही गप्पा करीत बसलों.

१९४९ सालीं सारा चीनदेश कम्युनिस्टांच्या वर्चस्वाखालीं आला त्यावेळीं प्रोफेसर शिट्-चेन्-पिंग नानकिंग विद्यापीठांत पाश्चिमात्य इतिहासाचे प्राध्यापक होते. कांहीं काळ पूर्वीच्या चिनी सरकारच्या शेतकी-खात्यांतहि त्यांनीं काम केलें होतें. नियतकालिकांच्या संपादनाचा आणि पुस्तक प्रकाशनाचाहि त्यांना चांगला अनुभव होता. म्हणूनच हाँगकाँग-कावलूनमध्यें रहायला आल्यावर त्यांनीं एक ...शनसंस्था स्थापली आणि हाँगकाँगमधल्या न्यू एन्लायटेन्मेन्ट प्रेससे डॉ. हेन्री वँग यांच्या सहाय्यानें एक चिनी भाषेंतलें सार्वदैनिक, एक साप्ताहिक आणि एक इंग्रजी पाक्षिक अशी नियतकालिकें सुरू केलीं. इंग्रजी पाक्षिकाचें नांव 'फ्रीडम् फ्रंट'. त्यावेळीं चीनमध्यें कम्युनिस्ट क्रांति नुकतीच झाली होती; आणि हाँगकाँगमध्यें कम्युनिस्ट हुकूमशाहीचा प्रचार करणारीं चिनी भाषेंतलीं 'लाल' पत्रेंच वरीचशीं होतीं. या प्रचाराची लाट परतवण्याचें कठीण काम आमच्या लोकसत्तावादी नव्या पत्रांनी फारच यशस्वीरीतीनें केलें, शिट् म्हणाले.

'तुम्ही फॉर्मोसांत पळालेल्या चांग-कै-शेकचे अनुयायी आहांत कीं काय?' मी विचारलें.

'मुळींच नाहीं,' आवेशानें प्रो. शिट् म्हणाले, 'तसें असते तर मी फॉर्मोसांत गेलों असतों,—इथें राहिलों नसतों. मी नि इथले माझे मित्र, सहकारी, विद्यार्थी—आम्ही सारे हुकूमशाहीविरोधी, पण स्वतंत्र, लोकसत्तावादी चीनचे पुरस्कर्ते आहोंत. चांग-कै-शेक हा सरंजामी हुकूमशाहीवादीच आहे. त्याच्या मूर्खपणामुळें तर चीन

कम्युनिस्टांच्या तावडींत गेला. त्याला चीन मधला शेतजमिनीचा प्रश्न मुळींच सोडवता आला नाहीं. चीनचाच काय,-साऱ्या आग्नेय आशियाचाच हा प्रश्न आहे. जो कुणी हा प्रश्न सोडवील तो आग्नेय आशियांतल्या सर्व देशांचा तारक ठरेल!'

'अस्सं?' मी म्हणालों, "'तुमच्या मावत्सेतुंगनं चीनमध्यें जमिनीचा प्रश्न सोडवून टाकलाय् की—'

'चांगलाच सोडवून टाकलाय्!' शिट् उद्गारले, 'शेतकऱ्यांना आणि बुद्धिजीवि मध्यमवर्गीयांना मावूच्या कम्युनिस्ट पक्षानं च्यांग-कै-शेकच्या मध्ययुगीन सरंजामशाहींतून सोडवतों असें सांगून क्रांति केली; आणि आतां त्यांना कम्युनिस्ट हुकूमशाहीच्या गुलामगिरींत जखडून टाकलेत! कम्युनिस्टांच्या राज्यांत सामान्य चिनी माणसाला सबंध दिवसांत जेमतेम दोन औंस तांदळांचा भात खाऊन कसें तरी जगावें लागतें. वर आणखी सरकार सांगेल तें काम निमूटपणें करावें लागतें—'

'असं कसं?', मी म्हणालों, 'अलीकडे कम्युनिस्ट चीननं कित्येक हजार टन तांदूळ आमच्या भारतांत निर्यात केला—' 'खरं आहे' शिट् म्हणाले, 'हाँगकाँगमध्येंहि चीनहून तांदूळ येतो. पैसे करण्याकरतां घरच्या लोकांना उपाशी ठेवून कितीतरी वस्तु आणि धान्य कम्युनिस्ट देश निर्यात करीत असतात. मावूनें लष्करी किंवा निमलष्करी व्यवसायांत दहा कोटी लोक अडकवलेत; आणि कम्युनिस्ट सरकारच्या नोकरशाहींत आणखीं दहा कोटी भरलेत. हे वीस कोटी म्हणजे चीनची एक तृतीयांश लोकसंख्या झाली. या एक तृतीयांशाला भरपूर खायला प्यायला देऊन कम्युनिस्टांनी आपल्या मुठींत ठेवलेत. चीनमधले जमीनदार नि सरंजामदार गेले, पण वीस कोटींचा हा नवा सत्ताधारी वर्ग उरलेल्या चाळीस कोटी सामान्य नागरिकांना चांगलाच पिळून काढतोय्!'

इतक्यांत डॉ. वु आले. तो म्हातारा चिनी नोकर आणि एक चिनी मोलकरीण जेवणाचें टेबल मांडीत होतीं. प्रो. शिट्चे सहात्तर वर्षें वयाचे वडील, कॅलिफोर्नियांत सेन् फ्रॅन्सिस्को येथें शिक्षण घेतलेल्या मादाम् शिट् आणि त्यांचीं तीन मुलें आम्ही बोलत असतां तिथें येऊन बसलींच होतीं. सौ. शिट्चें शिक्षण अमेरिकेंत झालेलें असल्यामुळें त्या उत्कृष्ट इंग्रजी बोलत होत्या. चिल्ड्रेन, कल्चर इत्यादि शब्दांचे उच्चार प्रो. शिट् 'चॉल्डन्' 'कॉल्चरल' असे चिनी पद्धतीनें करीत होते. पण मादाम्चे इंग्रजी उच्चार सफाईदार होते. सडपातळ, चिमुकल्या बांध्याच्या सौ. शिट्चा चेहेरा रेखीव, तरतरीत होता. सुंदर चिनी बाहुलीसारख्या त्या वाटल्या. आपल्या तिन्ही मुलांची त्यांनीं ओळख करून दिली. मुलांच्या चिनी नांवांचा अर्थ इंग्रजींत त्या मला सांगत होत्या. दहा बारा वर्षांचा



'ॲबर्डीन' मधील 'सांपन'

मोठा मुलगा—हा आमचा 'टायगर'— त्याच्या मागला हा 'लिट्ल् ड्रॅगन्'—नि ही सर्वांत लहान मुलगी—'फिनिक्स'. गुटगुटीत, गुलाबी चेहेऱ्याची छोटी 'फिनिक्स' अगदीं बाहुलीसारखी होती. चिनी नांवें हीं असलीं तरी मुलीला 'कॅथेरिन्,' मुलांना 'डेव्हिड्,' 'मिचेल्' या इंग्रजी नांवांनी आईवडील हांक मारीत होतीं. माझ्याकडे पाहून प्रो. शिट्नीं मुलांना विचारलें, 'हे पाहुणे इंग्लिश आहेत, इंडियन आहेत कीं, अमेरिकन आहेत ओळखा पाहूं!' मुलें ताबडतोब ओरडलीं. 'इंडियन्!'

शिट्चे वृद्ध वडील उंच, धिप्पाड बांध्याचे होते. त्यांना इंग्रजी फारसें येत नव्हतें. त्यांची ओळख करून देतांना शिट् म्हणाले, 'हे मोठे जमीनदार होतें. एके काळीं यांनीं राजकारण केलंय, लढाया लढलेत, व्यापाराच्याहि उलाढाली केल्यात!'

म्हाताऱ्यानें स्मित करून डोकें लववलें.

डॉ. वु म्हणाले, 'ही सर्व मंडळी दक्षिण चीनमधली--कॅन्टनजवळची आहे—यांची चिनी भाषा ज्यास्त शुद्ध असते. उत्तरेकडे मांचूच्या स्वाऱ्या झाल्या त्याचा परिणाम भाषेवर झाला. तुमच्याकडे नाहीं कां, दक्षिण भारतावर मुस्लीम संस्कृतीचा उत्तरेसारखा परिणाम झालेला नाहीं.'

बाजूला एका छोट्या टेबलावर मुलें जेवायला बसली. मोठ्या टेबलावर शिट्, त्यांचे वडील, सौ. शिट्, डॉ. वु आणि मी बसलों. नेहमींचें चिनी जेवण—भात, भाज्या, डुकराचे मांस यांचें असतें. तें होतेंच पण पाहुण्यासाठीं म्हणून शेजारच्या चिनी दुकानांतून शिजवलेलें बदक आणि एक मोठा थोरला गुबगुबीत मासा मुद्दाम आणवला होता. मांसाहार किंवा मत्स्याहार मला चालत असला तरी तो बेताबाच. मोठमोठे मांसखंड किंवा मत्स्यखंड माझ्याच्यानें खावबत नाहींत. पुढ्यांतला तो मासा आणि बदक पाहून मी चपापलों होतों. पण भाजीच्या बिन तिखट मिरच्या घातलेली पालेभाजी होती, बाजूला गरम गरम भात असलेला कांचेचा वाडगा होता, आणि आपापल्या छोट्या चिनीमातीच्या भांड्यांत तो वाढून घेण्याकरतां त्यांत एक मोठें डावूलहि ठेवलेलें होतें. आपापल्या दोन दोन काड्या घेऊन भाज्या, बदक, मासा, पोर्क सर्व जण पटापटा खाऊं लागली. वाडग्यांतला भात डाव्या हातांतल्या कपांत घेऊन तोहि भाज्या-पोर्कबरोबर काड्यांनी भराभर तोंडांत घालूं लागलीं. तुम्हीहि काड्यांनी खाण्याचा प्रयत्न करा म्हणून गमतीनें मलाहि दोन काड्या किंवा चॉप्स्टिक्स् देण्यांत आल्या होत्या. बशींतलें काड्यांत येईना, एखादें शित किंवा पोर्कचा तुकडा आला तर तो तोंडापर्यंत पोहोचेना. एकदोनदां

पोहोंचला तेव्हां प्रो. शिट्‌ हंसून 'सक्सेस ! सक्सेस !!' म्हणून ओरडले. काड्या द्रोंडाऐवजीं तोंडाबाहेरच फार जाऊं लागल्या आणि पोटांत तर फक्त दोन चार शितें भात आणि गोड्या मिरचीचा एखादा तुकडा गेला होता. पांच सहा मिनिटें माझे ते हाल पाहून झाल्यानंतर त्या म्हाताऱ्या चिनी नोकराला, मला काटेचमचे आणून द्यायला सांगण्यांत आलें. काड्यांनी खातां आलें नाहीं तें एकाअर्थी बरेंच झालें. खातां आलें असतें तरी माझ्यानें खाववलें नसतें. त्या बदकांत किंवा माशांत सर्वजण आपापल्या काड्या खुपसून हवा तेवढा तुकडा घेत होते, आणि चांगल्या चवीनें चोखलेल्या त्या उष्ट्या काड्या सर्वजण पुन्हां पुन्हां त्याच बदकांत किंवा माशांत घालीत होते !

काटा-चमचा आल्याबरोबर भोपळी मिरच्या घातलेली थोडीशी पालेभाजी, थोडासा बदकाचा तुकडा आणि थोडासा मासा मी माझ्या बशींत काढून घेतला. भात आणि पालेभाजीवरच बहुतेक आजची दुपार भागवावी लागणार हें मनाशीं ठरवलेंच होतें. तें नुसतें उकडलेलें बदक, डुकराच्या मांसाचे तुकडे किंवा तो मासा तोंडांत घातला तरी माझ्या घशाखालीं उतरणार नाहीं याबद्दल माझी खात्री होती, पण इतक्या प्रेमळपणें माझें आदरातिथ्य करणाऱ्या त्या भल्या चिनी मित्रांना मी सर्व कांहीं खातों आहे असें मला दाखवायचें होतें. म्हणूनच ते तुकडे मी बशींत घेतले होते; आणि मधून मधून तोंडांत घालून चोथा करून माशांतल्या काट्यांबरोबर ते मी बशींत एका बाजूला टाकीत होतों. या जेवणांत पावाचे तुकडे, लोणी वगैरे कांहीं नव्हतें. पण एक फार चवदार पदार्थ होता. तो म्हणजे कच्च्या कलिंगडाचा सुर्वा किंवा 'सूप.' एका मोठ्या थोरल्या चिनीमातीच्या वाडग्यांत तें गरमगरम 'सूप' होतें. त्यांत कलिंगडाचे तुकडे, आणि उंसाच्या चावलेल्या चोथ्यासारखा दिसणाऱ्या सोयाबीनच्या पांढरट सालीं तरंगत होत्या, वाढून घेण्याकरतां वाडग्यांत एक डावहि होता. भातांत पालेभाजी घालून, तो शक्य तितका मटकावला आणि हें गरमागरम 'सूप' त्यावर भरपूर प्यालों.

जेवणानंतर गप्पा करीत असतां मला नाटकांची विशेष आवड आहे हें प्रो. शिट्‌ना कळलें तेव्हां हॉंगकॉंगमध्यें एक चांगली चिनी नाटकमंडळी एक फार लोकप्रिय झालेलें संगीत चिनी नाटक सध्यां करीत असल्याचें त्यांनीं सांगितलें. आज रात्रीं येतां तर चला, ते म्हणाले. मादाम शिट्‌नांहि नाटक पाह्यची इच्छा होती. या नाटकाला फार गर्दी असते, तिकीटें मिळत नाहींत, तिकिटांचा काळाबाजारहि चालला आहे, तेव्हां काय करायचें असें म्हणत त्या म्हाताऱ्या चिनी नोकराशी ते कांहींतरी बोलले. तो डोळे मिचकावून हंसला, आणि आत्तां तिकिटें आणून देतों म्हणून पैसे घेऊन बाहेर पडला. अर्ध्या तासांत पहिल्या रांगेंतल्या मधल्या खुर्च्यांचीं तीन तिकिटें घेऊन तो आला, आणि हंसत

( पान ४८ वर चालू )

# तिपेडी

श्री. अरविंद गोखले हे महाराष्ट्रांतील अग्रगण्य कथाकार. गेलीं चौदा वर्षे ते लघुकथा लेखन करीत आहेत आणि मराठी कथेला त्यांनीं नवा आकार दिलेला आहे. 'तिपेडी' हा त्यांनीं हाताळलेला नवा प्रकार—श्री. अरविंद गोखले यांच्या अशा कथा दीपावलींतून क्रमशः प्रसिद्ध होतील.



अ र विं द गो ख ले

## १

'तोंडावर चट्टा असला म्हणून काय कुणाची लग्नं व्हायची थांबतात काय ?—थोट्या नि लंगड्या मुलींची देखील लग्नं होतात नि सुखाचे संसार होतात. रेवती तर काय धडधाकट आहे. फक्त गालावर मोठा चट्टा आहे; नि त्यातच उजवा डोळा लपला आहे. पण बाकी काय वाईट आहे ? तिचा उणेपणा लक्षांत घेऊन स्थळं पाहिली कीं झालं...येत्या वैशाखांत लग्न !'

टांग्यातून उतरून घरांत पाऊल टाकल्यापासून भय्याकाकांच्या तोंडाचा पट्टा सुरू झाला. वळकटी ठेवली, कपडे बदलले, पाय धुतले, चहा घेतला—एकीकडे बोलणं चालूच. पान खाऊन बोलणं अशक्य झालं तरी बोबडी वाक्यं मोठ्यानें बोलतच राहिले—'तुम्हीं राजबिंडी पोरं पाहिली असाल रेवतीला. पैसेवाली. आपल नाणं बद्द आहे. त्याला त्याच पट्टीतला सूर नको कां ?—'

रेवती आतल्या अंगाला सोप्यावर होती. उगाचच इकडे तिकडे करीत होती. सोप्याच्या खांबावर तेलकट आरसा लावला होता. रेवती तिकडे पहायचं टाळीत होती. पण कुठल्यातरी कोनातून रेवतीचा चेहरा कांचेत गेला होता. उजव्या गालावरचा काळा, चतकोर चट्टा. उजव्या डोळ्यापर्यंत चढलेला, प्रथम नजरेत भरे तो काळा, विद्रुप गाल व त्यावरचा मिचमिचा डोळा. नंतर टक लावून बघणारा मोठा काळाशार डावा डोळा दिसे. अन् मग उभट चेहऱ्याची शेलाटी रेवती संपूर्ण नजरेत येई.

डाग कांहीं आजचा नव्हता. जन्मापासून चेहेऱ्याला चिकटला होता. रेवती मोठी होत गेली तसा तेलामलमांना न जुमानता चट्टाही वाढत गेला. चट्टा वाढला पण लोकांचं चमत्कारीक बघणं व कुत्सित बोलणं कमी होंत गेलं. थांबलं. त्या व्यंगासह रेवती वागत वावरत होती. तिची ती जन्मखूण सर्वांच्या संवयीची झाली होती. जणूं तो कुरुप भाग तिथें नव्हताच. लोकांच्या डोळ्यांत नि मनांत भरत नव्हता. रेवतीला आरशांत दिसत नव्हता कीं एकांतात आठवत नव्हता. तो कुरुप तुकडा असूनही आपण चांगल्या, आकर्षक दिसतो, एवढ्याशा काळ्या व्रणानें काय आकाश कोसळलंय्, काळ्या कातडीला विसरायला लावतील असे आपले कुरळे केस, लांबसडक बोटं नि उभार बांधा आहे...असा निर्णय तिनें साडी नेसायला लागण्यापूर्वींच घेऊन टाकला होता.

पण कितीतरी वर्षांनी घरांत त्या व्यंगाचा उल्लेख झाला. रेवतीच्या मनांत त्याचे पडसाद उमटले. आरशातलं तिचं प्रतिबिंब दचकलं. सोप्यातून, परसदारातून, दूर दिसणाऱ्या एका जुनाट वाड्यावर वाढणाऱ्या वडाकडे पहात ती आपला उजवा गाल कुरवाळूं लागली.

'कुठंय तुझी डायरी—काढ पाहूं स्थळांची यादी...अटी बघितल्या की कळेल लगेच. तूं अजून सुरवातच केली नाही म्हणतोस—' भय्यासाहेब जेटा मारून बसले होते व नेटानें रेवतीसाठीं स्थळं बघायच्या मोहीमेचा मुहूर्त करीत होते. वडिलांना जमलं नाहीं, नुसती स्थळांची यादी आणून बे स्वस्थ बसले, बावरून वेळ घालवूं लागले—म्हणून भय्याकाकांनी धांव घेतली होती. त्यांचा अनुभव व त्यांचा आवेश पाहिल्यावर ह्या मोसमांत रेवतीला हळद लागणार ह्याची खात्री खुद्द रेवतीलाही वाटूं लागली.

धुण्याचे पिळे विहीरीजवळच्या दगडावर ठेवीत रेवती पाण्याकडे पहात होती. तिला लग्न करायचं होतं. साडी नेसायला लावण्याआधीच लग्नाचे विचार तिला लपेटले होते. चारचौघीसारखं लग्न व्हायचं, सासरी जायचं, सासूची मर्जी संभाळायची, मुलं व्हायची, मोठेपणा घेऊन कार्यं करायची...संसाराची स्वप्नं पहातांना रेवतीच्या मनांत नवऱ्याबद्दल मात्र निश्चित कल्पना नव्हत्या. उघड्या नि मिटल्या डोळ्यांनीं ती आपली सासू पाही, शेजघर पाही—पण नवरा कधी तिच्यापुढें स्पष्ट आला नाहीं. अस्पष्टशी आकर्षक पुरुषाची आकृति तिला अस्वस्थ करी...पण त्याचं शरीर तिच्या मनानें कधी न्याहाळलं नव्हतं. इतर गोष्टी इतक्या ठळक—नि नवरा मात्र मूर्तिमंत मनांत नसावा त्याचं रेवतीला विलक्षण आश्चर्य वाटलं. धुण्याचे पिळे सोडून आपल्या नवऱ्याला पहायला ती विहीरीच्या काठावरून वाकली.

पण विहीरीचं शेवाळ फोडून भय्याकाका घराबाहेर पडतांना तिला दिसले. वरसंशोधनाचा डाव ते मांडीत होते. गालावर विद्रूप खूण असलेल्या रेवतीला पत्करेल असा नकटा नवरा मुलगा हुडकत होते.

जमलेली स्थळं भय्याकाकांनीं पहिल्या फटकाऱ्यानें बाद केली. मेकॅनिकल इंजिनिअर, सॅनिरटी इन्स्पेक्टर, ड्राफ्टस्मन, हायस्कूलांत खेळ शिकवणारा, उस कारखान्यांतला हिशेब तपासनीस—यादी आकर्षक होती. पण रेवतीला उपयोगाची नव्हती. तेवढा तो पट्टा नसता, चेहेरा चांगला असता, नुसता चेहेराच असता तर ही स्थळं ठीक होती. ह्या वरची डॉक्टरं वकिलाची चालली असती. पण होता फक्त चट्टा, मग त्याला जुळणारं, पटणारं ठिकाण हवं होतं. जमा केलेली यादी कुचकामाची होती. ही पोरं रेवतीला पसंत करणार ?—

कां नाही ? कां नाही ?...चुलीखाली जाळ करीत व तोंड मागें नेत रेवतीचं मन पुकारूं लागलं. माझ्यांत काय कमी आहे ?- फक्त तेवढा डाग. तेवढाच. पण तो विसरायला लावेल असं मोहक रूप, रसरशीत बांधा...धुरानें ती कासावीस होत होती. जुन्या वाड्याजवळ राहणारं जोडपं चुरचुरणाऱ्या डोळ्यापुढें आणीत होती. नवरा धिप्पाड इनामदार-नि त्याची बायको काळी, कुबडी !-होतात कीं अशी लग्नं ! कुरुप पुरुषांना लावण्यवतिका मिळतात, तशा कुरुप तरुणींनाहि.

...विजोड जोडपी ठरवणं हे देवाचं एक मोठं धोरणच नाही का ?... भय्याकाकांचा तिला राग आला. चांगल्या स्थळांना हुसकावून ते कुणीतरी कुरुप माणूस तिच्या गळ्यांत बांधणार होते. तिचं आयुष्य मातीमोल करणार होते...

'आपलाच दाम खोटा...हिचं तोंड पाहून तरुण पोरं तोंड फिरवतात. असतो साधा कारकून, पण हवी असते अप्सरा त्याला. नुसते चेहेऱ्याकडे बघतात वेटे...' भय्याकाका रेवतीच्या देखत, रेवतीकडे पहात बेधडक बडबडत होते. घरचं वैगुण्य बरच्यांनी ओळखावं हा त्यांचा अट्टाहास होता...'तुमच्याजवळ पैसा देखिल नाही पोरीला थोराघरीं द्यायला. भारंभार हुंडा द्यायची ऐपत असती तर...' त्यांनी आणीक एका व्यंगाचा गाजावाजा करायला सुरवात केली.

खिडकींत उभं राहून रेवती रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्याकडे पहात होती. उगाच. उदास. एक साधा कारकून, दुसरा मोटर मेकॅनिक... दोघांनीही रेवतीला नापसंत ठरवली. भय्याकाकांचं म्हणणं खरं होतं पड खायला हवं होतं. तडजोड करायला पाहिजे होती. तसलीच कांहीं गोम असलेलं, व्यंग असलेलं ठिकाण पाहायला हवं होतं. देवळाजवळ राहाणारी रेवतीची मावसबहिण काळी शार नि खूप लठ्ठ-म्हणून तिला नाही कां विधुराला दिली ?

रेवतीला अंधेरी आली अन् तरी ती सताड डोळ्यांनी रस्ताभर पहात राहिली. कितीतरी तरुण मुलं रस्त्यानें जात होती. राजबिंडं आकर्षक कुणी होतीं का त्या गर्दीत ? रेवती प्रत्येकाकडे निरखून पाहू लागली. घामट कपडे, फरफटती चाल, रस्त्यावर थुंकणं, दाढीचे खुंट खाजवणं...एक पोक काढून चालत होता. दुसरा अंधळा होता. तिसऱ्याचे कान मुडपलेले होते...पंधरावीस माणसं पाहिली पण त्यांत बोहल्यावर उभं राहायच्या ऐटीचा एकही नव्हता...पुरुषजातीत केवढी कुरुपता, कळकटपणा भरला आहे. मग लग्न होणं अशक्य आहे थोडंच ?

कोण मिळणार ? कोण पत्करणार ?—रेवती व्याकुळ होऊन गाया घालूं लागली. बाबांनी शेत विकायची तयारी केली होती. भय्यासाहेबांचा जोडा उसवला होता. रेवतीच्या चेहऱ्यावरचा दागिना सगळ्या घरांत झगमगूं लागला...स्थळांच्या यादीवर लाल फुल्या होत होत्या. आशा सोडली नव्हती फक्त रेवतीनें ! दिवस जात होते नि आपलं लग्न जवळ जवळ येत चाललं असं तिला जाणवत होतं. देवी डॉक्टर, सॅनिटरी इन्स्पेक्टर, रंगाची विक्री करणारा, भाजीचं दुकान काढणारा, कांहींच न करणारा—काळा कुळकुळीत-व देवीचे वण असलेला, तीन मुली असलेला विधुर, दम्यामुळें घरीं बसलेला...

कधीं नाहीं तो नवऱ्याचा विचार रेवतीच्या मनांत सारा वेळ येऊं लागला. आपल्या नवऱ्याची मूर्ति करण्यासाठीं मिळेल ती माती रेवती जमवूं लागली. लग्न !—मग कुणीहि चालेल !—विधुर, दमेकरी; पाय मुरगळलेला...एक पाय नसलेलाही ! गालावरच्या चट्टयाच्या बरोबरीनें, थोड्या झुकत्या मापानें सुद्धां...आंधळ्या मुक्या मुलींची लग्नं होतात त्यांना धडधाकट स्थळंही मिळतात- दैवयोगानं...आपलं कसं दैव ? धडधाकट कीं आंधळं ?



## चन्द्र फिका....

चंद्र फिका...चंद्र फिका
झाड पानपान मुकें
मिटल्या पंखांवरतीं
धुंद धुकें मंद झुकें

देंठ दुखे...देंठ दुखे
फूल पाकळींत विझें
आणि कुठें...आणि कुठें
भूत सांवलींत भिजें

डोह रिते...डोह रिते
रंग तरंगांत मिटे
बुडत्या क्षितिजावरती
शब्द अक्षरांत फिटे

चंद्र मुका...चंद्र मुका
सूरभग्न गीत इथें
मिटल्या डोळ्यांवरतीं
स्वप्नमग्न ओंठ तुझे.

—सदानंद रेगे

---

छातीशीं उशी घेऊन रेवती रात्र रात्र जागत राही. उशीसारख्या धडाला कसले हातपाय नि नाकडोळे उगवणार याचा विचार करीत बसे. कसलं कां त्याचं रूप असेना, कुणीतरी आपल्याला पत्करणार याबद्दल तिला खात्री होती. कुरुप पण समंजस तरुणांची न संपणारी रांग तिच्यापुढून जात होती, अन् उशीवर गाल टेकून ती अंधारांत वर्षानुवर्षे वाट पहात होती...

* * *

## २

चालतां चालतां ती त्याला एकदम बिलगली. त्यानें तिला जवळ ओढलं व तिच्या चिचोळ्या हनुवटीजवळ तोंड आणलं. दोघंही थरथरलीं. थबकली. सावल्या एक झाल्या. सगळा निसर्ग स्तब्ध झाला...

पण त्याचे डोळे, उघडेच राहिले. पापण्यांची विचित्र उघडझाप होत राहिली. लिपस्टिकचा रंग ओठांनीं पुसला जात होता, पण विष्णू विचित्र डोळ्यांनीं शीलाच्या उंचावलेल्या चेहऱ्याकडे, गळ्याभोंवती गेलेल्या बाहूंकडे, मागे झुकलेल्या मानेकडे पहात होता. त्याच्या घशांत अडकल्यासारखं झालं व गळफास सुटण्यासाठी तो कासावीस झाला.

'काय झालं?' शीला आरोरा परत चालत म्हणाली.

'कांही नाहीं—' विष्णु घोगऱ्या आवाजांत म्हणाला व तिच्याबरोबर चालूं लागला. त्याच्या खांद्याला तिचा खांदा घासत होता. दुपट्ट्याचे नायलॉन त्याच्या तोंडावर येत होतं. ती त्याच्या इतकीच उंच होती! पांच फूट पांच इंच. मग—मग—

त्यानें पुन्हां चमत्कारिक नजरेनें तिच्याकडे पाहिलं. ते तिच्या ध्यानांत आलं व ती म्हणाली,

"क्यूं?"

विष्णूनें मान हाळवली. तो पुढें बघणार तेवढ्यांत शीलाची बोटं त्याच्या डोळ्यांना लागली.

"सॉरी हं–मी तुझ्या ओठाची लिपस्टिक पुसणार होते–" शीलानें त्याच्या ओठाकडे रुमाल नेला. त्यानें तिच्या हातून तो इवलासा घामेजला रुमाल घेतला व ओठावरून घासला. ओठाकडे न्यायचा रुमाल तिनें वर नेला, हे उमगून त्याचं तोंड कडू झालं. वाटलं हें सगळं सोडून पळून जावं—

पण छे–ओठावरचं जांभूळ तो असं भिरकावून देणार नव्हता. पंधरा वर्षांपूर्वी बाळगलेली महत्वाकांक्षा अचानक सफळ झाली होती. कॉलेज संमेलनाच्या खेळांत हर्डल्स्वर उड्या घेत चित्त्यासारख्या जाणाऱ्या मिस् आरोराला पहातांना विष्णूनें मित्रांत पैज मारली होती कीं ह्या पंजाबी पोरीचा एकदां तरी मुका घेईन!

एकदां तरी!—विष्णूला आज दिवसभर घेतलेली असंख्य चुंबनं आठवली. क्रिडांगणावर शेकडो विद्यार्थी टाळ्या वाजवीत आहेत असा भास झाला. विष्णूसारखा नुसताच मवाली पोरगा शीला आरोराच्या दुपट्ट्याला तरी स्पर्श करूं शकेल काय? शेकडो मुलांनीं टर उडवली व विष्णूच्या अंगावर शेंगांची फोलपटं टाकली.

गुलटेकडीच्या त्या गवती गालीचावर उभं राहून सगळ्या कॉलेजला शीट घालावी असं विष्णूला तीव्रतेनें वाटलं. या बेट्यांनों—बघा माझं भाग्य! शीला आरोरा माझ्या मुठीत, मिठीत आहे. शेजारकुटुंबाबरोबर ती दर शनिवारीं रेसला इथें येते—नि रेस टाकून माझ्याबरोबर भटकते. लग्न झालंय तरी! नवरा मिलिटरींत मेजर आहे तरी! बघ साल्या घाटग्या नि दस्तुऱ्या नि परांजप्या नि सरदारजीच्या बच्च्या. शीला आरोराला मी जवळ घेतो, तिची चुंबनं घेतो! चुंबनं?...

विष्णु दचकला. शेंगांच्या फोलपटांचा पाऊस पडतो आहेसं त्याला वाटलं व त्यानें कडू ओठावरून कोरडी जीभ फिरवली.

"तीन वुईक् एण्डस् आले मी पुण्याला. आतां नाहीं यायला जमायचं—आमची बदली झालीय् जे अँड के ला—"

"जे अँड के?"

"जम्मू अँड कॅश्मिर—" शीला ओठ जुळवीत नि मान मागें

टाकून, झाडावरचं फळ पाडावं तशा आविर्भावात म्हणाली. विष्णूनें तोंड वळवलं, पण तिचा हात पकडून तो टेकडी उतरूं लागला. शीलाचा हात गरम, गुबगुबीत होता. लाललाल होता. तिचे गाल गोबरे व सफरचंदी होते, केस भुरे नि मुरभुरे होते. डोळे ब्रनेल नव्हते, पण धीट होते. नवऱ्याला, शेजाऱ्याला चकवून ती विष्णूला भेटत होती. त्याच्या मिठीत जात होती —

" विष्णू, तूं येशील कश्मीरला ?... मेजर सूद असले तरी हरकत नाहीं. मी सांगेन माझा कॉलेजमधला सवंगडी आहे—"

" तुझे कॉलेजचे दोस्त येतात असे तुझ्याकडे ? नि सगळे असेच वागतात ?"

" पुन्हां गैरसमज ! " शीला थांबून म्हणाली. ती उतरणीवर तोल सांवरीत होती. जरा वर असलेल्या खडकावर विष्णू उभा होता त्याच्याकडे जरा वजावून—जरा आवर्जून पहात होती. "सांगितलं ना तुला— कोर्सवर तूं भेटलास, आपण क्वालिटींत गेलों...जुनी ओळख म्हणून. कॉलेजच्या आठवणी उगाळायला म्हणून. तिथें तूं तुझ्या पैजेचं सांगितलंस. मला तें आवडलं. गंमत वाटली. अन् वाटलं, कॉलेजचं तुझं स्वप्न पुरं करावं... मग एका चुंबनानं तहान वाढली म्हणून..." शीलानें ओठ जुळवले, तिरपी मान केली नि थांबून म्हटलं, " फक्त चुंबनच हं !—मला नवरा आहे..."

विष्णूला वाटलं कीं ही कडवी पोर चुंबनावरच थांबणार, परतणार. पुढल्या आठवड्यापासून आयुष्यांतून नाहीशी होणार. संध्याकाळच्या सोनेरी सावल्या त्याचं रक्त तापवूं लागल्या. आणिक कांहीं जमलें नव्हतं त्याला ! खूप डावपेंच केले, विनवण्याही केल्या...पण शीला आरोरा जास्त जवळ येऊं देत नव्हती.

त्या विचित्र मुलीला विष्णुनें कवेंत घेतलं. महॉगॉनीच्या एकाकी झाडाखालीं दोघं थबकली. हे सुख सरणार, अधिक लाभणार नाहीं, ह्या जाणीवेनें विष्णू पेटून निघाला. शीलाला कवटाळून तिच्या गालांची, कपाळाची, गळ्याची, भुवयांची नि ओठांचीं चुंबनं घेत सुटला.

शीला मुसावली होती. नवऱ्याला फसवून परक्या इसमाशीं प्रणय-क्रीडा करणारी ती पुरंध्री कसल्या मोहांत अडकली होती, कुणास ठाऊक ! पुरता तोल जाऊं न देतां पापाच्या डोहांत डोकावण्याचा ती विलक्षण खेळ खेळत होती ! मान उंचावून, ऊचा उंचावून ! हात वर करून विष्णुच्या गळ्याभोंवती टाकीत ती उभी होती.

विष्णू भानावर आला आणि उंचावरचं फूल तोडायच्या पवित्र्यांत उभ्या असलेल्या शीलाची आकृति पाहून परत अस्वस्थ झाला. ही सुंदर, विवाहित, प्रणयक्रीडेंत प्रवीण तरुणी चुंबनासाठीं असा कां पवित्रा घेते, त्याला कळेना. अशी कां मान मोडते, टाचा उंचावते, हात वर फेकते ?...त्याला वाटलं, तिला शिकवावं. तला विचारावं...पण न बोलतां तिला लगटून तो चालूं लागला.

" मला टॅक्सी करून दे. मी जाईन एकटी...पुन्हां नाहीं जमायचं भेटायला...तूं मुंबईला आलास तरी मी दिसणार नाही...श्रीनगरला आलास तरच..."

शीला अरोरा व्याकूळ झाली होती. विष्णूला तर एखादं वनभोजन संपावं तसं विषण्ण वाटत होतं. टेकडी उतरून दोघं रस्त्याला लागले. येणाऱ्या जाणाऱ्या रिक्शा बघूं लागले. एका कल्व्हर्टपाशी उभं राहून एकमेकाकडे पाहात उभे राहिले.

विष्णूला एकदम कल्पना सुचली. शीलाला कल्व्हर्टवर उभं राहायला त्यानें सांगितलं नि मग एकदम तिच्या कमरेभोवती हात टाकून तो म्हणाला,

" अखेरचा—निरोपाचा-"

" इथें ? "

भुवया उंचावून व जरा मागे होऊन शीला म्हणाली. पण ती लगेच तयार झाली. विष्णू तिच्याकडे पाहूं लागला. वाटलं, ही बोलण्यांत नि बिलगण्यांत तयार असलेली स्त्री आता तरी नीट...पण तिच्या हाताची तऱ्हेवाईक हालचाल झाली. मान वर खाली झाली. विष्णूला तिची लकब परत विचित्र वाटली. पण एकदम तो सगळं विसरला. तिची हालचाल, सभोंवतालची वर्दळ--

तेवढ्यांत एक रिकामी रिक्शा धडपडत आली. शीला तशीच खाली उतरली व रिक्शांत चढली...हात दाखण्याचा, रुमाल हालवण्याचा, निरोप घेण्याचा सोहळा सुरू झाला--

\+ + + +

शीला आरोरा पुण्यातून गेली. विष्णूच्या आयुष्यातून गेली. विष्णूं जे अँड के ला गेला नाहीं. पंधरा वर्षांपूर्वीची पैज जिंकल्याची प्रौढी मिरवायला कुणी जुना मित्र दिसतो कां ते शोधूं लागला. तऱ्हेवाईक शीलाची विचित्र चुंबनं एकांतात आठवूं लागला.

दोन वर्षांनी कॉलेज ज्युबिलीच्या प्रसंगी माजी विद्यार्थ्यांच्या संमेलनास विष्णू गेला. खूप जुने मित्र जमले होते. जुन्या आठवणी काढीत होते. पूर्वीची पैज नि आता झालेली पूर्ति कथन करायला विष्णू आतुर झाला होता.

तेवढ्यांत शीला आरोरा त्या मेळाव्यांत आली. नवऱ्यासह आली ! विष्णूला--तिनें ओळख दिली नाहीं. विष्णू दचकला. अन् मग शीलाकडे बघण्याऐवजीं तिच्या नवऱ्याकडेच डोळे फाडून बघत राहिला. आपादमस्तक बघत राहिला ! गुलटेकडीवरची लोंबकळती चुंबनें त्याच्यासमोर गरगर फिरूं लागली...

मेजर सूद चांगले पावणेसात फूट उंच होते !

* * *

## ३

माणसं जोडायचं तिला वेड नाहीं, पण एकदां जुळालेले संबंध कायमं टिकवायची काळजी घ्यायचं तिला नीट ठाऊक आहे. ढीगभर नातेवाईक-कुणाच्या मागण्या, कुणाचे मानपान, पण ही आपल्या परीन सगळ्यांना सांभाळते. ऐन संसाराच्या भरांत संतुष्ट राहायची, समतोल वागायची कला तिला छान कळाली आहे.

आम्ही खरं म्हणणे दूरदूरचे, नावाचे नातलग. राहातोही गावाबाहेर. पण संक्रांतिचं, चैत्रगौरीचं हळदीकुंकू आलं कीं हिचं कार्ड यायचंच. मंडईतून परततांना मी दिसलो कीं आग्रह करून मला घरी न्यायची व चहा द्यायची. कधी कंटाळा आला कीं आपल्या दोन्ही मुलींना खाकोटी घ्यायची व आमच्या घरीं संध्याकाळपर्यंत बसायची.

माझ्या पत्नीचा नि तिला स्नेह जमण्यासारखा नव्हता. पातळ्याच वेगळ्या. पण ती आली कीं आम्हाला बरं वाटायचं. तीही तास दोन तास बसून तृप्त मनानं परत जायची. आपल्या हृदयातला एखादा दागिना, काळजांतला एखादा सल दाखवायला तिनें आमच्या माजघराचा कोपरा निवडला होता.

दर खेपेस सांगण्यासारखं असेच कांहीं तिच्याजवळ. सुतासारख्या संसारातल्या सुमार कथा. पण त्या इवल्याशा कागाळ्यांना, गुपितांना, हर्षखेदांना तिच्या आसुसल्या बोलण्यानें वेगळीच झळाली यायची.

खिडकींतून दिसणाऱ्या टेलिफोनच्या तारावर लटकणारे फाटके पतंग पहात ती माझ्या पत्नीशी बोलत असे. आणि मी जवळच तिच्या दोन्ही मुलींशी खेळत असे.

तिच्या गप्पाइतकाच तिच्या जुळ्या मुलींचा आम्हांला लळा लागला होता. प्रथम प्रथम दोघी एकसारख्या दिसायच्या म्हणून आम्ही कौतुक करीत होतो. आतां दोघींमधला फरक ओळखतां येतो म्हणून आम्ही रंगून जाऊं लागलो. दोघी मोठ्या मिष्ठास होत्या. लाघवी, नाजूक. सारखे कपडे, सारखी केशरचना--दोघींचे खेळही सारखे--

जुळ्यांच्या जन्मापासून तिची सुखदुःखं अर्थात् त्या मुलींभोवतीं वेढली जात होती. बाळंतपणांत झालेले क्लेश, मुलींना ओळखण्याबाबत होणारे तिचे घोटाळे, निपुत्रिक नणंदेनं मुलींना दिलेल्या सोन्याच्या साखळ्या...एक ना दोन ! मुली पाचसहा वर्षांच्या झाल्यावर हे कमी झालं. खर्चाच्या ओढाताणीबद्दल नि मुलींना काय शिक्षण द्यायचं ह्याबद्दल ती दर भेटींत बोलूं लागली.

मुली तिच्यापासून अलग झाल्या, मोठ्या, एकट्या खेळण्याजोगत्या झाल्या अन् ती मुलींकडे वेगवेगळ्या दृष्टींतून पाहूं लागली. 'एकाच बाळंतपणानें खर्च वाचला खरा, पण उमेद कायमची गेली...' कधी ती दोन्ही पोरींना आवरीत घरी निघतांना म्हणे--'निदान एक मुलगा हवा होता--एक मुलगी नि एक मुलगा--' दोघींची भांडणं सोडवतांना तिला मुलाचा उमाळा येई...तर कधी म्हणे, 'एकीचं लग्न करून देईन; दुसरीला घरीच शिकवीत ठेवीन. कन्यादानाचं पुण्यही मिळेल नि पुत्रवियोगाचं दुःखही होणार नाहीं...' एकाच वेळेला दोन गर्भ वाढवलेल्या त्या स्त्रीच्या भावनांचे कोड पहाण्यांत आम्हीही रंगून जात असूं.

तिच्या नणंदेचा नवरा वारला नि तिच्या आमच्याकडच्या खेपा बंद झाल्या. नवऱ्याची ती थोरली बहीण श्रीमंत होती, प्रेमळ होती. पण नवरा अचानक गेल्यानें निराधार झाली व अगतिक होऊन भावाच्या घरी आली.

हिनें त्या विधवेची आसवं पुसायची पराकाष्ठा केली. आपल्या लहानसहान विरंगुळ्याच्या गोष्टीही बाजूला ठेवल्या. पैसा गांठी आहे, मोठी नणंद आहे--म्हणून नव्हे, तर नवरा मेल्यानें हीनदीन झालेली स्त्री आहे म्हणून ती त्या विधवेचं दुःख कमी करूं लागली... आम्ही समाचाराला गेलो तेव्हां अमळ हंसून म्हणाली, 'आता जरा माणसांत आल्या आहेत त्या. माझ्यामुळें नाही--ह्या पोरींमुळे. दोघीही त्यांच्या दोन्ही डोळ्यांना पाणी आणून देत नाहीत.' आपल्यां दोन्ही लेकींनी नणंदेस माणसांत आणली म्हणून तिला फार समाधान वाटत होतं. जुळ्यांना जन्म देतांना झालेल्या क्लेशाचं सार्थक वाटत होतं.

नणंद भावाच्या घराजवळ वेगळं बिऱ्हाड करून राहूं लागली आणि हिचं उरलं सुरलं सुतक सरलं. मंडईतून परततांना मी तिच्या घरीं गेलों तेव्हां तिनें हंसतमुखानें माझं स्वागत केलं. नणदेच्या नव्या बिऱ्हाडाची बातमी तेव्हांच सांगितली. तिचा नवरा नि दोन्ही छोकऱ्याही नव्या बिऱ्हाडांतलं सामान लावायला गेल्या होत्या. घरावर आलेलं सावट सुटलं म्हणून ती आनंदांत होती. 'आता येईन

एकदां...खूप गप्पा मारायच्या आहेत—' ती तीनतीनदां मला सांगत होती.

खिडकीतून दिसणाऱ्या फाटक्या पतंगाकडे पहात आम्हीं तिची आठवण काढीत असूं. वाट पहात असूं. बरेच दिवस ती आमच्याकडे फिरकली नाही. मी परत तिच्याकडे खेप करावी म्हणत होतो, तों एका माध्यान्ही ती येऊन ठेपली. एकटी.

चहा झाला. गप्पा झाल्या. बऱ्याच दिवसांनी आमच्याकडे आल्यानं खूप टवटवीत, मोकळं मोकळं वाटतय् असं ती म्हणत होती. मला मात्र वाटत होतं की ही मलूल आहे. हिच्या मनांत कांहीं सल आहे. ते तिला सांगायचंहीं आहे. पत्नीनें त्याच अभिप्रायानें माझ्याकडे पाहिलं.

पत्नीनें पुन्हां त्याच अभिप्रायानें माझ्याकडे पाहिलं. अन् त्या वेळेला ते तिनें पाहिलं. तिनें पाहिलं हें आम्ही पाहिलं. आम्ही दोघं ओशाळे झालो. अन् ती रडवेली झाली. मान फिरवून खिडकीबाहेर टेलिफोनच्या तारां पहात बसली. तंतुवाद्य आडवं टाकून त्यावर श्रांत माथा टेकून बसलेल्या सुंदरीच्या चित्रासारखी, त्या टेलिफोनच्या तारासमोर तिची उभट मुद्रा दिसत होती.

ती तशीच बसून राहिली. मला फार विचित्र झालं. मुलींशीं खेळण्यांत स्वतःला लपवावं, तर आज तिनें मुलींनांहि आणलं नव्हतं. मला काय करावं कळेना. बायकोकडे बघणं तर अगदींच अशक्य होतं.

पण बायकोला शहाणपण सुचलं. अवघड प्रसंगांत प्रांजलपणें वागायची माझ्या बायकोची रीत होती. ती सरळच म्हणाली,

" आम्ही दोघंहि विचार करतोय. तुम्हाला कांहींतरी होताय. तुम्ही नाखूष, नाराज दिसताय नसांगण्यासारखं तर कांहीं घडलं नाहीं ना ?"

सरळ सरळ काळजांतली कळ दाबली गेल्यानें ती दचकली. गदगदली. मान हालवून पुन्हां स्तब्ध झाली. पण तिला वेदनेचा उमाळा आवरत नव्हता..

जराशानें ती वळून आमच्यासमोर बसली. घोगऱ्या आवाजांत सांगूं लागली,

" ताई, विचित्र वाटेल कां सांगितलं तर ?–विचित्रच आहे हो. दोंन मुलींचा प्रसाद एकदम मिळाला म्हणून मी सुखांत होते. पण—पण आतां एकीला अंतरावं लागणार आहे मला...नाहीं, नाहीं... दोघी चांगल्या आहेत, आज सिनेमाला गेल्या आहेत वन्संच्या बरोबर...पण त्यांतली एक जाणार. माझ्यापासून दूर जाणार. ओढून नेली जाणार—"

आम्ही बघतच राहिलो. इतकं विचित्र कधी बोलली नव्हती ती. इतकी व्याकूळही झाली नव्हती आजवर.

" जुन्या काळी नणंद नवरा मेल्यावर भावजयींचा सगळा संसारच ओरबडायला निघायची. आता एवढंच बरं आहे कीं एखाद्या पोरावर भागतंय त्यांचं—".

माझी पत्नी चपापून म्हणाली, " एवढं काय घडलं ?–त्या तर बेगळ्या राहायला लागल्याहेत. पैसेही खूप आहेत त्यांच्याजवळ–"

" पण माणसं नाहींत—" आवाजातली खर कमी करीत ती म्हणाली, " मुलं नाहींत, कुणाला तरी पोटाशी धरून जगायला हवं त्यांना. एखादं आपलं मानतां येईल असं मूल !–अन् भावाला आहेत दोन मुली. जुळ्या. दोन काय करायच्याहेत त्याला ? उलट त्याच्या बायकोची ओढाताणच होते. एक पोर बहिणीकडे वाढेल. तिला तेवढाच विरंगुळा. माया लावायला कुणी जीव...ताई, कुणी असा कट करीत नाहीं–पण मला हे भविष्य स्पष्ट दिसतंय. दोघींना आम्हीं मुद्दाम वन्संकडे धाडतो हल्ली. त्यांना सोबत व्हावी, बरं वाटावं, वेळ जावा म्हणून. पण हे फार दिवस चालणार नाहीं. अन् मग तोड, तडजोड म्हणून एका मुलीला त्यांचा लळा लावून त्यांच्या घरीं वाढवलं जाईल–कळत म्हणा, नकळत म्हणा—"

विचित्र होतं, पण खरं होतं. गेला आठवडा दोघी जणी त्या विधवेच्या बिऱ्हाडीच होत्या. तिला सोबत, मुलींना बदल म्हणून. एकीला गोंवर आला तेव्हां दुसरीला तिकडेच ठेवून दिलं. आज दोघी तिच्याबरोबरच सिनेमाला गेल्या. त्या विधवेला मुलींचा लळा लागणार. एकाकी जीवनांत कुणी लहान मूल जवळ असावं असं तीव्रतेनं वाटणार. भावाला दुर्दैवी बहिणीची कणव येणार. अन् तिच्या पैशाकडेही नजर राहणार..." मी पत्नीकडे पाहिलं. तिच्याकडे पाहिलं. ती आपल्याच नादांत पुढें म्हणाली.

" मी अप्पलपोटी नाहीं हो ! त्यांच्यावर आकाश कोसळलंय हे मला कळतंय. त्यांच्यासाठीं खूप करायला हवंय खरं...पण...मी स्वैपाकघराच्या किल्ल्या त्यांना देऊन सुनेसारखं राबले असते त्यांच्याजवळ. पण त्या वाटा मागणार तो पोटच्या गोळ्याचा. ही वाटणी सोपी आहे असंच सगळ्यांना वाटतंय...मुलगा असता न् मुलगी त्यांच्याकडे ओढली गेली असती...किंवा लहान मोठ्या दोघी असत्या तर मला एकवेळ एवढं वाटलं नसतं. पण पण ह्या दोघी सारख्या-जुळ्या आहेत हो ! कुठली त्यांच्याकडे जाणार हेंही मला ध्यानांत येत नाहीं. दोघी माझ्या लेखी एकच आहेत. एकाच लेकराचे दोन तुकडे नाहींत कां हे ?...नणदेनी एवढी भयंकर खंडणी कधीं घेतलीय कां भावजयीकडून...? "

ती आंतल्या आंत रडत होती. कुद्दही झाली होती. टेलिफोनच्या अबोल तारापुढें तिची म्लान मुद्रा थरथरत होती. • • •

"कपाळांत डोळे आहेत ते मेंदूनिशीं
जास्त चांगलें दिसावें म्हणून
चेहऱ्यावरचे तारे म्हणजे देवीचे वण आहेत
गळ्याकडचे चिलटांसारखे
दिसणारे डाग म्हणजे वेदनेची खूण
दांत चावणें चालू आहे तें
पुनरुत्थानाच्या दिवशीं नव्हे, तर आज
कोट टाय आणि कडक कॉलर या
कुलीनतेच्या निशाण्या आहेत"—



Self Portrate

# फ्रान्सिस न्यूटन सूझा

कांहीं दिवसांपूर्वी लंडनमधल्या माझ्या एका मित्रानें मला एक दुर्मिळ पुस्तक पाठविलें. त्याचें नांव Words and Lines (शब्द आणि रेषा) हे शब्द आणि या रेषा निर्माण करणाऱ्या माणसाचें नांव फ्रान्सिस न्यूटन सूझा.

पुस्तक अनेक अर्थांनीं दुर्मिळ आहे. एक म्हणजे त्याच्या फक्त एक हजारच प्रती छापण्यांत आल्या आहेत. म्हणजे पाश्चात्य प्रकाशनाच्या दृष्टीनें खरोखरच मोजक्या. साडेसात रुपये किंमतीच्या या पुस्तकाच्या पन्नास प्रतींवर सूझाची स्वाक्षरी आहे, आणि म्हणून त्यांची किंमत चक्क पंचेचाळीस रुपये ठेवलेली आहे !

सूझा हा मुळांतच एक अजब माणूस आणि एक अजब कलावंत आहे. त्याच्या लेखांचा व चित्रांचा संग्रह करणारें हें पहिलेंच पुस्तक. त्यांतलीं सत्तावीस पानें चार आत्मचरित्रात्मक लेखांना वाहिलेलीं आहेत व अकरा रेखाचित्रांना. शिवाय या पहिल्या सत्तावीस पानांत चित्रें आहेतच. हे लेख आणि हीं चित्रें दोन्हीं जगावेगळीं आहेत. आणि पाश्चात्य कलाक्षेत्रांतील सूझाचा आजचा भाव लक्षांत घेतला तर त्याचें हें पहिलेंवहिलें पुस्तक उत्तरोत्तर किती दुर्मिळ होत जाईल हें सांगायला नको !

पंधरा वर्षांपूर्वी सूझा हा मुंबईत धडपडणाऱ्या अनेक तरुण चित्रकारांपैकीं एक होता. त्याचें नांव त्यावेळीं फ्रान्सिस न्यूटन एवढेंच होतें. पुढें बऱ्याच वर्षांनीं त्यानें सूझा हें नांव लावलें. असें म्हणतात कीं, आयझॅक न्यूटन या जगद्विख्यात नांवाशीं आपली गफलत होऊं नये म्हणून त्यानें हा बदल केला ! (शिवाय फ्रान्सिस बेकन नांवाचा सुद्धां एक विख्यात ब्रिटिश चित्रकार आहे !)

१९४५–४६ च्या सुमाराला सूझाची आणि माझी प्रथम ओळख झाली. त्यावेळीं रॅम्पार्ट रो मधल्या बॉम्बे आर्ट सोसायटीच्या जागेंत त्यानें आपल्या चित्रांचें पहिलें प्रदर्शन भरवलें होतें. त्यापूर्वी जे. जे. स्कूल ऑफ आर्ट मधील एक बंडखोर आणि दंगेखोर विद्यार्थी म्हणून, त्याचप्रमाणें कम्युनिस्ट पक्षाच्या जवळपासचा एक चित्रकार म्हणून तो ओळखला जात असे. या प्रदर्शनामुळें मात्र त्याचें नांव ज्याच्या त्याच्या तोंडीं झालें.

या प्रदर्शनांत न्यूटननें चारचौघांसारख्या नग्न स्त्रियांच्या आकृत्या (nudes) तर मांडल्या होत्याच, पण रस्त्यांत नागडे-उघडे भटकणारे, वेडसर, घाणेरडे, ओंगळ भिकारी (pederasts) सुद्धां रंगवले होते. न्यूटनच्या डोक्यांत त्यावेळीं साम्यवादाचें, आणि साम्यवादाला मान्य असलेल्या वास्तववादी कलेचें वारें होतें ! परंतु त्याची जनताभिमुखता अस्सलपणें व्यक्त झाली होती ती त्याच्या गोव्याच्या पार्श्वभूमीवरील चित्रांत. आधुनिक शैलीच्या चित्रकारांत लक्ष्मण पै यांचीं गोव्याचीं चित्रें जितकीं कोरीव आणि नाजूक तितकींच न्यूटनचीं रांगडी आणि ओबडधोबड आहेत. पण हे दोन्हींहि परस्परविरोधी शैलींचे चित्रकार गोव्याच्या मातींतून वर आलेले आहेत. आणि कर्मधर्मसंयोगानें आज दोघांनींहि युरोपांत आपलें घर केलें आहे !

मुंबईत असतांना न्यूटन क्रॉफर्ड मार्केट-

जवळच्या एका चाळींत राहायचा. लक्ष्मण पै हे आर्ट स्कूलमध्यें गाजलेले विद्यार्थी आणि शिक्षक. न्यूटनच्या मागें कांहीं वर्षें असलेले. न्यूटन मात्र विद्यार्थ्यांच्या संपांत प्रामुख्यानें भाग घेतल्याबद्दल स्कूलमधून हांकलला गेलेला ! पण हे दोघेहि साध्या पुठ्ठयावर तैलरंगांत आपलीं चित्रें रंगवीत. दोघेहि कलंदर वृत्तीचे, पण पै त्यांत जास्त अंतर्मुख वृत्तीचे. चित्रकलेविषयीं बोलायला दोघेहि उत्सुक. दोघांचीहि मतें ठाम बनलेलीं, पण न्यूटनला चित्रकलेशिवाय इतर विषयांवरसुद्धां—ज्या विषयांत त्याला गम्य नाहीं त्या विषयांवरसुद्धां—बडबडायची, वाद घालायची हौस ! आज लक्ष्मण पैनीं पॅरिसमध्यें आपलें बस्तान चांगलें बसवलेलें असलें तरी चित्रांच्या खपाच्या दृष्टीनें, आणि एरवींसुद्धां, न्यूटनचा लौकिक फार आहे.

न्यूटन आणि पै यांची तुलना ओघानें आली. एरवीं मायदेशांतील उदासीन परिस्थितीला कंटाळून परदेशीं स्थायिक होणारे इतरहि कांहीं कलावंत आपल्याला सांपडतील. या सर्वांत श्रेष्ठकनिष्ठ ठरवायचें काम चित्रकलेचे दर्दी टीकाकार करतीलच. आज मात्र न्यूटन जो त्या सर्वांपासून उठून दिसतो आहे तो त्याच्या "शब्द आणि रेषा" या पुस्तकाच्या जोरावर. या सर्व कलावंतांत लेखक असा तो एकटा तर आहेच; पण शिवाय माझ्या मतें त्याचें कुंचल्यापेक्षां लेखणीवरच प्रभुत्व जास्त आहे ! आणि म्हणूनच या पुस्तकांत जेवढें त्याचें दर्शन घडतें तेवढ्याचीच मी ओळख करून देणार आहे.

लंडनमध्यें असतांना न्यूटनची जास्त जवळून ओळख होण्याचा योग मला लाभला



होता. माझे मित्र शिल्पकार सदानंद बाकरे आणि न्यूटन हे कांहीं काळ एकाच इमारतींत राहात होते. बाकरे, मी, आमचा एक विद्वान् व रसिक महाराष्ट्रीय मित्र आणि न्यूटन यांचा गप्पागोष्टींचा फड क्वचित् एखाद्या दारूच्या गुत्यांत (ज्याला पाश्चात्य समाजजीवनांत आपल्याकडल्यापेक्षां जास्त संभावित स्थान आहे !) पडायचा. अशाच गप्पागोष्टींतून, त्याचप्रमाणें ऐकीव माहितींतून माझ्या मनांत उद्भवलेलें न्यूटनचें चित्र मी मुद्दामच बाजूला ठेवणार आहे. मी लंडनला असतांना न्यूटनच्या चित्रांचें एक प्रदर्शन इंडिया हाउसच्या तळघरांत भरलें होतें. त्याचा गाजावाजाहि खूप झाला होता. परंतु न्यूटनचा जो प्रचंड उत्कर्ष झाला तो मात्र त्यानंतर, मी लंडन सोडल्यावर.

त्याकाळीं सुद्धां न्यूटन लेखक म्हणून आम्हांला परिचित होता. परंतु या क्षेत्रांत त्याचा आजच्या एवढा उदोउदो होईल असें

## ज्ञानेश्वर नाडकर्णी

तेव्हां कांहीं वाटलें नव्हतें. स्पष्ट सांगायचें म्हणजे कलावंत आणि लेखक म्हणून न्यूटनबद्दल आम्हांला जरी आदर वाटत होता तरी व्यक्ति म्हणून तो एक थोतांड आहे अशी आमची खात्री होती. परंतु त्याचें पुस्तक उघडून जर तुम्ही त्याचें आत्मचरित्रात्मक लिखाण वाचलें तर त्याच्यावर शेरा मारणें इतकें सोपें नाहीं हें तुम्हांला कळून येईल.

त्याच्या पुस्तकाच्या अगदीं सुरवातीलाच आभारप्रदर्शनाची जी छोटीशी यादी आहे त्यांतच न्यूटनचा इरसालपणा आणि त्याची अवखळ रसिकता (जी कवित्वाला अगदीं जवळची आहे असा माझा समज आहे) पुरेपूर व्यक्त होतात :

My thanks to John Sankey who made this book possible; to Victor Musgrave of Gallery One for this and that; to Harold Korner and Mr X for sustenance; to the two L's, the one who gave me life, that is birth, the other who gives me love, that is bed and not bad which makes must of the stuff in this book. And of course there's God to thank for who first makes Life possible and then impossible.

F. N. S.

London, May 1959

यांतील दोन "L" चा गूढ उल्लेख पाहा. विशेषतः दुसरा "L" कीं जी आपल्या शेजेची भागिदार आहे हें न्यूटननें बेधडकपणें (परंतु माझ्या मतें आतां रूढ झालेल्या बेधडकपणानें) कबूल केलें आहे. त्याच वाक्यांतला बेड् आणि बॅड् या शब्दांनीं साधलेली कोटी मार्मिक आहे—एखाद्या डिलिन् टॉमसच्या कवितेंत शोभावी अशी आहे. आणि शेवटच्या देवाबद्दलच्या विधानांतला विरोधात्मक विनोदहि न्यूटनच्या तल्लख बुद्धीचें प्रत्यंतर देतो.

हें पान उलटलें कीं, न्यूटननें रेखाटलेलें स्वतःचें चित्र आपल्याला दिसतें. हें इतक्या भयानक शैलींत रेखाटलेलें आहे कीं, नवकलेचा आधींच धसका घेतलेले लोक तें पाहून पळ काढतील यांत शंका नाहीं ! या पुस्तकांत अशी बरींच भयानक चित्रें आहेत. दिशाहीन रेखाटनापेक्षां (doodling) अशा चित्रांना मी जास्त महत्त्व द्यायला तयार नाहीं. परंतु हीं किळसवाणीं, कुरूप व्यक्तिचित्रें सुद्धां मनाला एका प्रकारची गुंगी आणतात.

सलामीलाच न्यूटनचें जें आत्मचित्र आहे त्याच्या जोडीला त्या चित्राचा खुलासा करणाऱ्या खालील कवितासदृश ओळी आहेत.

"कपाळांत डोळे आहेत ते मेंदूनिशीं जास्त चांगले दिसावे म्हणून

चेहऱ्यावरचे तारे म्हणजे देवीचे व्रण आहेत



गळ्याकडचे चिलटांसारखे दिसणारे डाग
म्हणजे वेदनेची खूण

दांत चावणें चालू आहे तें पुनरुत्था-
नाच्या दिशेनें नव्हे, तर आज

कोट टाय आणि कडक कॉलर या कुलीन-
तेच्या निशाण्या आहेत."—

या शेवटच्या ओळींतला खवचटपणा तुमच्या लक्षांत येईलच !

या पुस्तकांत एकंदर चार प्रकरणें आहेत. पहिल्याचें नांव "आत्मचरित्राचा एक चतकोर." दुसऱ्याचें नांव "एका किल्ल्याचा निर्वाण." तिसऱ्याचें नांव "माझ्या दैनंदिनींतील उतारे." आणि चौथ्याचें नांव "मी आणि माझा मित्र."

पहिल्या प्रकरणांत आपल्याला कळतें कीं, न्यूटनचा जन्म गोव्यामध्यें १९२४ सालीं झाला. त्याचे आजोबा आणि आजी दोघे भयंकर दारूडे होते ! त्याविरुद्ध प्रतिक्रिया म्हणूनच कीं काय, न्यूटनचा बाप दारूच्या थेंबालासुद्धां स्पर्श करीत नसे. न्यूटन म्हणतो, "असें सांगतात कीं, दारूड्या लोकांचे वंशज फार कल्पक वृत्तीचे निपजतात. पूर्वजांच्या स्वभाववैशिष्ट्यांची पुनरावृत्ती होऊन कीं काय दारुड्या आजोबाची स्वप्नें, त्यांतील किरमिजी हत्ती आणि इतर प्राणी नातवंडांच्या वांट्याला येतात, आणि या नातवंडांना तींच स्वप्नें दारू पिऊन तर्रर्र न होतां सुद्धां दिसतात. तुम्ही जर माझीं चित्रें पाहिलीं तर हा तर्क कितपत खरा आहे हें तुम्हांला लगेच कळेल."

न्यूटनचा बाप त्याच्या वयाच्या चोविसाव्या वर्षी, आपला मुलगा तीन महिन्यांचा असतांनाच हें जग सोडून गेला. त्याच्या पुढल्या वर्षीच न्यूटनची दीड वर्षानें मोठी असलेली बहीणसुद्धां वारली. न्यूटन लिहितो, "माझी आई, माझ्या मावश्या, माझी आजी आणि माझे सगळे नातेवाईक धाय मोकलून रडले, आणि म्हणाले, देवानें मुलीला ठेऊन मुलाला न्यायला हवें होतें; ती इतकी सुंदर, इतकी प्रेमळ आणि तिच्या वयाच्या मानानें इतकी हुषार होती. मी मात्र नाका-कानांतून पाणी वाहणारा, इतर प्रत्येक मोठ्या माणसाची आणि लहान मुलांची धास्ती घेतलेला हडकुळा मुलगा होतों. मी मेलों असतों तर बरें झालें असतें. माझा बराचसा त्रास वांचला असता. कलावंताच्या पिळवटलेल्या आत्म्याला थारा देऊन, जो देश आपल्या कलावंतांचा द्वेष करतो आणि जो आपल्या संस्कृतीबद्दल उदासीन आहे त्यांत कला निर्माण करण्याचें काम मला करावें लागलें नसतें."

या शेवटच्या वाक्यांतील सुप्त वल्गना आणि कडवटपणा हीं दोन्हीं न्यूटनच्या स्वभावाला शोभण्यासारखींच आहेत. हें खरें कीं भारतांतील परिस्थितीला कंटाळूनच न्यूटननें १९४९ सालीं इग्लंडला प्रयाण केलें. त्यानंतर सुद्धां त्याचा जो उत्कर्ष झाला त्यांत स्टीव्हन स्पेन्डरसारख्या मातब्बर रसिकांनीं त्याला जो हात दिला त्यांचाच बराचसा वांटा आहे.

बहिणीच्या मृत्यूनंतर छोट्या न्यूटनला देवी आल्या. आणि त्यांतून तो मरतां मरतां बचावला. त्याची आई जास्तच कर्जबाजारी



झाली. वेष पालटून तिनें मुलांसकट मुंबईला पळ काढला, आणि लघुलेखिकेची नोकरी धरली. परंतु तिला शिवणकामाची जास्त आवड होती, म्हणून तिनें नोकरी सोडली आणि शिंप्याचा व्यवसाय सुरू केला. "तिच्याकडून मीं शिवणकामाचे धडे घेतले, कारण शाळेंत मी ढँग होतों" असें न्यूटन लिहितो. "म्हणजे इतर व्यवसाय जमले नाहींत तरी उपजीविकेची तयारी असावी म्हणून ! आज मला कापड कापणें व शिवणें येत नाहीं, पण विजारीला बटणें लावतां येतात !"

यानंतर आपल्या स्वतःच्या कलेविषयीं न्यूटन चार गोष्टी सांगतो. त्या सर्वांवरच विश्वास ठेवण्याचें कारण नाहीं, कारण ज्या कलावंतांना आपल्यावरील प्रभावांची खरीखुरी जाणीव आहे त्यापैकीं कांहीं न्यूटन नाहीं हें त्याच्याशीं चित्रकलेसंबंधीं चर्चा करणाऱ्या कुणालाही कळू शकेल.

पण याच संदर्भातील हें विधान पाहा "मला चित्रें काढतां येत हे आमची शाळा चालविणाऱ्या जेझुइटांना चांगलेंच ठाऊक होतें. त्यामुळें संडासांत एखादें चित्र आढळलें कीं त्याचा कर्ता म्हणून माझाच संशय घेतला जाई. तें काय आहे म्हणून मी पहायला गेलों कीं, ह्याचा दर्जा मला सामान्य वाटे. मी त्यांत सुधारणा करी. वाईट चित्रें काढलेलीं मला आवडत नाहींत !"

यांतला खट्याळ विनोद मुद्दामहून समजाऊन द्यायला पाहिजे का ? या मजकुराच्या जवळच मानवी संभोगाचें निकट दर्शन घडविणारें न्यूटनच्या हातचें एक रेखाटन आहे. तें आजच्या अश्लीलता मार्तंडांना जबरदस्त धक्का देईल. जास्त कुतूहलानें या रेखाटनाकडे पाहाणाऱ्याला असें दिसून येईल कीं, तें पूर्णपणें वास्तव नसून, त्यांत दोनतीन संभोगासनांतील पवित्रे मिसळलेले आहेत. संडासांतील चित्रकलेचें मानसशास्त्रीय दृष्टिकोनांतून विवेचन करण्याचा प्रयत्न झालेला आपल्याला सहसा दिसत नाहीं. परंतु या चित्रकलेबद्दल लिहितांना जवळच तत्सम शैलींतील एक चित्र छापण्यांत न्यूटनचा (आणि त्याच्या प्रकाशकांचा) मार्मिकपणा दिसतो खास !

न्यूटननें आपल्या लहानपणींच्या आठवणी अत्यंत सावेपणें सांगितलेल्या आहेत. गोव्यांतील निसर्गसौन्दर्याचे आणि खिश्चन धर्माचे त्याच्यावर सखोल संस्कार होणें अपरिहार्य होतें. खिश्चन कलावंतांना खिस्तप्रतिमेची परंपरागत देणगी मिळालेली आहे. आणि न्यूटननें तर क्रूसावरील खिस्त वारंवार रेखाटून व रंगवून अक्षरशः राबवला आहे असें म्हणावें लागेल. अर्थात् पुराणप्रिय खिस्ती पाद्र्यांना संमत असलेला गोंडस खिस्त आणि त्याची कुमारी माता न्यूटनच्या बंडखोर चित्रांत वेगळेंच, जास्त सच्चें स्वरूप धारण करतात.

आपण चित्रें कशी काढतों या संबंधानें न्यूटननें लिहिलेला या पहिल्या प्रकरणाअखेरीचा परिच्छेद अतिशय बोलका आहे. म्हणून तो इथें जसाच्या तसा उद्धृत करतों !

अनुक्रमणिका

" मी जेव्हां रंगवायला सुरुवात करतों तेव्हां मी माझ्यांतच गुंतलेला, धुंद झालेला असतों. शानदार मोटारगाड्यांचीं आणि उघड्या गळ्यांच्या तरुण पोरींची मला शुद्ध नसते. गर्भाशयांतल्या गर्भासारखा आंतल्या आंत गुंडाळलेला असतों. मला जाणीव असते ती फक्त याची कीं, प्रत्येक चित्र ही प्रगतीची नवी पायरी तरी आहे नाहींतर माझा मृत्युलेख तरी आहे. परंतु गर्भाशयांतला गर्भ ही एक निर्माण झालेली वस्तू असते. रंगविणें थांबलें कीं, मला मोटर-गाड्यांचा आणि तरुण पोरींचा विचार सुचतो. किंवा मी हॅंडेलचें लार्गो आणि रॉक् अरांऊन्ड् द क्लॉक् यांचे सूर शीळेवर काढतों. रंगवीत असतांना मी स्वतःची गठडी उलगडीत नाहीं. लिहित असतांना मात्र मी ती सोडतों. रंगाची ट्यूब चेपली कीं, मी गुंडाळला जातों. कुंचल्याच्या प्रत्येक फटकाऱ्याबरोबर काठीनें डिवचलेल्या सापासारखें मी आंतल्या आंत वेटोळें घालतों. रंगाचा वास मला आवडत नाहीं. रंगवणें मला सुंदर वाटत नाहीं. तें एखाद्या सर्पासारखे कुरुप आहे. मी त्याच्यावर हल्ला करतों. तें पुन्हां पुन्हां वेटोळें घालीत मनोहर आकृति निर्माण करतें, परंतु मला आकृतीमध्यें गम्य नाहीं. नाहींतर मी दिवसचे दिवस आकाशांतले ढग नाहींतर स्त्रियांचीं वस्त्रें पाहाण्यांत घालवले असते. खरोखर मनोहर असतो तो गवतांतला साप ! चकाकता, रत्नजडित, हिरव्या गवतांत सळसळणारा. विषारी दांत आणि दुष्ट बुद्धी असलेला, चेपून बाहेर काढलेल्या रंगासारखा गिळगिळीत. हिरवें डोकें, हनुवटीपासून तो शेपटीपर्यंत पांढरं शुभ्र पोट, पिवळे डोळे, तांबडी दुहेरी जीभ, गिळगिळीत; त्याच्यावर पाय देऊं नका हो, सैतानासारखा कपटी आणि तरी देवासारखा सुंदर. शेपटी ही स्नायूमध्यें नसते. ही सत्ता विकत घेण्यांत अगर बॉंब गोळ्यांमध्यें नसते. संघर्ष हा आजकाल राष्ट्रांमध्यें माजलेल्या तणातणीसारखा नसतो. मी एखाद्या बालकासारखा (अगर माकडासारखा) स्वतःची अगर आपण काय करतो आहोत त्याची जाणीव नसतांना रंगवीत नाहीं. परंतु गर्भाला सापासारखीच विलक्षण चिकाटी असते. आणि सफरचंदें दाखवून मोहजालांत कसें ओढायचें हें सर्पाला माहीत असतें. आपल्या बासलेल्या बायकोचें चित्र रंगवितांना सेझान् तिच्या अंगावर खेकसायचा, ' सफरचंदासारखी बैस पाहूं ! ' कांहीं म्हणा, सफरचंदामध्यें अनेक सत्यें असतात. अॅडॅम्स् अॅपल् आहे. न्यूटनचें सफरचंद आहे, वेकरलीचें सफरचंद आहे सेझानचें सफरचंद आहे. चित्रकलेंत हीं सर्व आणि शिवाय आणखी जमवलेलीं सत्यें असतात. घाटाचें, दृष्टिभ्रमाचें, वजनाचे आणि ताणाचे अपराध पोटांत घालण्याचें, रंग आणि भूमितीनिष्ठ रचनेचे, सर्पाच्या चातुर्याचें, सैतानाच्या राक्षसी सौंदर्याचें, जिवंत गर्भाच्या गुंडाळलेल्या रहस्याचें—अशीं सत्यें. "

हा संबंध उतारा असंबद्ध आणि दुर्बोध विचारांनीं भरलेला असला तरी त्यांत एखादें निरीक्षणतत्त्व विजेसारखें चमकून जातें. उदा. सफरचंदाविषयींचें न्यूटनचें विधान. एरवी निर्मितीच्या प्रक्रियेविषयीं कलावंतानें स्वतः लिहूं नये हेंच खरें.

दुसऱ्या प्रकरणांत आपण भारतांत पुन्हां आलों असतांना गोव्यांत जे दिवस काढले त्याचें वर्णन न्यूटननें केलेलें आहे. या संबंध पुस्तकांतला बऱ्याच अंशीं वस्तुनिष्ठ असा

लेख हाच समजला पाहिजे. "एन्काउन्टर" सारख्या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या मासिकाच्या एका अंकांत हा लेख प्रसिद्ध झाला होता.

या गोव्याच्या मुक्कामांत आपण एकटेच आरामांत कसे राहिलों, मसालेदार तिखट जेवणाचा, निसर्गसौंदर्याचा आणि दारूचा आस्वाद कसा घेतला हें न्यूटननें रसरशीत शब्दांत सांगितलें आहे. चित्रकार म्हणून प्रसिद्धी मिळाल्यावर बऱ्याच वर्षांनीं न्यूटननें हातांत लेखणी धरली. परंतु चित्र रंगवितांना आपल्याला जो आत्मविश्वास वाटतो तो लिहितांना वाटत नाहीं असें त्याचें म्हणणें. तरी आत्माविष्काराची ओढ इतकी प्रचंड कीं, लिहिल्याशिवाय त्याला राहावतच नाहीं.

या संदर्भांत तो म्हणतो: "मी व्याकरण कधीं शिकलों नाहीं, आणि माझें स्पेलिंगहि निर्दोष नाहीं. परंतु कांहींतरी सांगावें, निदान एखादा आवाज करावा, साधा हुंकार द्यावा किंवा घसा साफ करतांना होणारा आवाज करावा असें मला फार वाटतें. मला काय वाटतें माहीत आहे का? मला वाटतें, माझ्या पेनच्या नीबवर माझ्या कंठाच्या शिरा अलगद ठेवाव्यात. कांट्याच्या टोकावर घांसभर अन्न ठेवतात तशा! तोंड बंद ठेवून बोलणाऱ्या जादूगारासारखा आवाज फेंकावा, पण तो कागदावर! पोष्टाच्या तिकिटाप्रमाणें एका बाजूला डिंक लावलेले आवाज काढावे, म्हणजे ते कागदावर सहज चिकटतील! माझ्या पेनचें दुहेरी टोंक एखाद्या तापलेखनयंत्राची जणू थरथरती सुई करावी, जशी मी रेखाचित्रें काढतांना सहज बनते तशी! परंतु बहुतेक हिंदी लोकांना शब्दांकरवीं आत्माविष्कार करणें जमत नाहीं. आपल्यामध्यें मूलतःच एक प्रकारचा संधिवात असतो; रोधून धरलेली एक प्रकारची सुप्त शक्ति......"

न्यूटनची प्रतिभा ही अव्वल दर्जाची आहे यांत शंकाच नाहीं. परंतु त्याला गोलमाल विधानें करायची वाईट संवय आहे. वरील परिच्छेदांत त्यानें हिंदी लोकांसंबंधीं केलेलें विधान कोणत्या सरासरीवर आधारलेलें आहे? परंतु ही एवढी "ठोकुनी देतो ऐसाजे" वृत्ति सोडली तर त्यानें लिहिलेलें गोव्याचें वर्णन वाचतांना त्याच्या अभिजात



**अनोळखी मुलगी**

या निर्जन डोंगरावर
बांबूचें एक बेट आहे.
त्या बेटावर...
वादळाचा मामा
घालतो आहे हमामा.
पण अशा या वेळीं
ही अनोळखी मुलगी
कशासाठीं करते आहे
माझ्यापाशीं सलगी ?

कवित्वशक्तीची, त्याचप्रमाणें इंग्रजी भाषेवरील त्याच्या आश्चर्यकारक प्रभुत्वाची वारंवार प्रचीति येते. भारतीयांबद्दल तो पुष्कळदां बेजबाबदारपणें लिहितो, त्याचप्रमाणें स्वतःच्या अंतःरंगांत खोल शिरतांना तो जरा गडबडून जातो. परंतु या दोहोंमागील भाबडेपणाचेंच त्याच्या पाश्चात्य वाचकांना जबरदस्त आकर्षण वाटत असावें!

गर्भाच्या कल्पनेनें न्यूटनला भयंकर वेड आहे. आपली शैली रेखाटनाच्या एका मूलतत्त्वापासून निर्माण झालेली आहे असा त्याचा समज दिसतो. हें तत्त्व म्हणजे रेखाचित्रें काढतांना आकृतीला घनता देण्यासाठीं रेषांची जीं जाळीं तयार करावीं लागतात त्याचेंच एक मूलरूप आहे. उदा० असें जाळें कांहीं चित्रकार केवळ आडव्या रेषा वापरून तयार करूं शकतात, तर कांहीं फुलीसारख्या आकृत्या काढून, तर कांहीं टिंबें काढून. परंतु या मूलतत्त्वाला एक तंत्र या पलिकडे कांहीं अर्थ नसतो. न्यूटन मात्र आपलें हें मूलतत्त्व (दोन समांतर रेषा, प्रत्येक रेषेच्या बाहेरच्या बाजूला चौकोनी जाळें) कांहींतरी गूढ असल्याचा आव आणतो!

या पुस्तकाचें तिसरें प्रकरण म्हणजे "डायरींतील टिपणें." न्यूटनशीं संभाषण करण्याचा ज्यांना योग आला आहे त्यांना या टिपणांत न्यूटनचें स्वतःविषयींचें बडबडणेंच ऐकूं येईल. विचार या दृष्टीनें हीं टिपणें अतिशय बालीश आहेत. जॉन ऑस्बर्न् या अलिकडे गाजलेल्या तरुण ब्रिटिश नाटककाराचें "लुक बॅक् इन अँगर" हें नाटक तुम्हीं वाचलें आहे काय? त्याचा नायक जिमी पोर्टर हा ज्या प्रकारची बंडखोर, वेछूट परंतु बालीश बडबड करीत असतो त्याच प्रकारचें वक्तव्य न्यूटनच्या दैनंदिनींत आपल्याला वाचायला मिळतें. ओघानें आलें म्हणून म्हणतों, कीं "अँग्री यंग् मॅन्" हें काय प्रकरण आहे असें कोणी विचारलें तर न्यूटनकडे बोट दाखवायला बिलकूल हरकत नाहीं! या रागावलेल्या तरुणांच्या पिढींत ध्येयवादाचें आणि उथळपणाचें, वेछूटपणाचें आणि पोरकटपणाचें, गुणवत्तेचें आणि धूर्तपणाचें, श्रद्धेचें आणि पाखंडीपणाचें जें स्फोटक मिश्रण दिसतें तें न्यूटनच्या स्वभावांत, त्याच्या चित्रकलेंत आणि त्याच्या वाङ्मयांत प्रातिनिधिकरीत्या दृष्टीस पडतें.

या पुस्तकाचें शेवटचें प्रकरण ज्या पानावर सुरू होतें त्याच्या माथ्यावरच एकमेकाला खेटून उभे असलेल्या दोन पुरुषांचें चित्र आहे. मघां ज्या मूलतत्त्वाचा उल्लेख केला त्याचाच वापर या मानवी आकृतींना, त्याचप्रमाणें पार्श्वभूमीवरील घरांना, घनता देण्यासाठीं करण्यांत आलेला आहे. दोघेहि न्यूटनच्या ज्या आत्मचित्राचा उल्लेख सुरवातीला केला त्यासारखे भेसूर, भयानक अशा चेहऱ्यांचे आहेत. प्रकरणाचें नांव "मी आणि माझा मित्र". या दोन आकृतींपैकीं उजवीकडचा न्यूटनचा मित्र "नॉर्मन एडम्स". हें सबंध प्रकरण म्हणजे न्यूटन

आणि त्याचा वाचक या दोहोंमध्ये एक काल्पनिक संभाषण आहे. त्याचा विषय-नॉर्मन एव्हन्स !

हें संभाषण न्यूटननें बऱ्याच नाटकी ढंगानें रंगविलेलें आहे. एव्हन्स हा एक कवि आहे अशी कल्पना करून, आपण रेखाटलेल्या त्याच्या चित्राचें न्यूटननें अनपेक्षित दृष्टिकोनांतून विवेचन केलेलें आहे. परंतु यांतहि आपल्या रेखाटनशैलीच्या मूलतत्त्वाविषयीं बराचसा चमत्कारिक मजकूर आहेच. गर्भाच्या कल्पनेचें न्यूटनच्या मनावरील भयंकर दडपण येथेंहि दिसतें. जीवनांत आपण जीं कांहीं शुद्ध मूल्यें मानतों त्यांना त्याच्या हृदयांत एक वेगळ्याच प्रकारचें स्थान असलेलें तुम्हाला दिसेल. आपल्या आईवडिलांबद्दल तो रूढ आदरानें लिहीत नाहीं, तर प्रामाणिकपणानें लिहितो.

प्रस्तुत प्रकरणांत तो लिहितोः "माझी आई ईडिपसच्या आईसारखी होती–अंगयष्टीनें ती कणखर, स्वभावानें लहरी आणि नाजूक होती. ती आंघोळ करीत असतांना दरवाजाला पाडलेल्या एका भोंकांतून मी पाहात असे. त्या भोंकांतून ती पटकन् कांहींतरी खुपसून माझें बुब्बुळ रक्तबंबाळ करून टाकील अशी मला भीति वाटे. मी भिंतीवर तिचीं चित्रें काढी, परंतु शिष्ट लोकांना तें पसंत नसे. कां कोण जाणे, कारण मला चांगलेंच आठवतें कीं, मी तिच्या गर्भाशयाच्या भिंतीवरसुद्धां चित्रें रंगविलीं होतीं. आठवण करून करून माझा चेहरासुद्धां गर्भासारखा झाला आहे. मी निर्माण होत असतांनाच निर्मिति करूं लागलों."

निर्वाण या शब्दाप्रमाणेंच आनंद हा शब्दसुद्धां न्यूटन सैलपणें वापरतो. परंतु बहुसंख्य पाश्चात्य वाचकांना त्यांत कांहींच वावगें वाटायचें नाही. त्यांच्या दृष्टीनें न्यूटन, योगविद्या, वेदांत, निर्वाण, आनंद हे सारे भारतीय संस्कृतीचेच मसाले !

या शेवटच्या प्रकरणांत न्यूटननें स्वतःविषयीं आणखी कांहीं लिहिलें आहे. परंतु तेंहि थोडें self conscious आहे ! परंतु न्यूटनला त्याची कदर नाहीं. आधीच्याच प्रकरणांत तो लिहितो: "विल्यम प्लोमर नांवाच्या कोणातरी माणसानें (वास्तविक हा एक सुप्रसिद्ध ब्रिटिश साहित्यिक आहे !) कुठें तरी लिहिलें आहे कीं, आत्मचरित्रांत स्वतःची कींव, स्वतःचा बचाव किंवा आत्मप्रौढी असूं नये हेंच उत्तम. हें थोतांड आहे, कारण याच दुर्गुणांमुळें आत्मचरित्राला गुणवत्ता लाभत असते. ज्याला स्वतःविषयीं लिहायचें धैर्य असतें तो म्हणजे एखादा केविलवाणा मनुष्य असला पाहिजे. आणि मानवी दुर्गुण ही देखील किती दुःखद गोष्ट आहे—किती किती दुःखद, किती सुंदर !"

अशी ही न्यूटनची आणि त्याच्या पुस्तकाची कहाणी. पण पुस्तक येथेंच संपत नाहीं—जसें त्याचें जीवनहि ! पुस्तकाच्या अखेरीला त्याच्या रेखाचित्रांचा एक जुडगा आहे. तंत्राच्या दृष्टीनें यांतील कित्येक चित्रें नापास करतां येतील. इतकेंच काय न्यूटनभोंवतीं प्रसिद्धीचें जें वलय आहे त्याच्याच प्रकाशांत हीं चित्रें चांगलीं आहेत असें म्हणण्याचें धाडस एखाद्याला होईल. परंतु ज्याला चित्रकलेंत रंगणाऱ्या रेषेच्या, काळ्या शाईच्या आणि पांढऱ्या पोकळीच्या विलासाचें मर्म माहीत आहे त्याला न्यूटन हा एक अस्सल चित्रकार आहे याबद्दल संदेह राहत नाहीं.

यांतील कांहीं चित्रें आपल्या संस्कारांना धक्का देतील. परंतु त्यांचा बरेवाईटपणा आपण तांत्रिक निकषांवरच जोखला पाहिजे. यांतील कांहीं चित्रें स्त्रीपुरुषांचीं, कांहीं टेबलावरील वस्तूंचीं, तर कांहीं खिडकीबाहेरील दृश्यांचीं आहेत. तीं प्रथमदर्शनीं अ-वास्तव वाटलीं तरी चित्रकाराच्या अंतर्मनाच्या कुशींतून तीं बाहेर पडलेलीं असल्यामुळें वास्तविक तीं जोरदार वास्तव आहेत. अर्थात् न्यूटनचीं रंगचित्रें या पुस्तकांत छापलेलीं नाहींत, त्यामुळें चित्रकार म्हणून त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा येथें साकल्यानें विचार करतां येत नाहीं.

(पान २७ वर पुढें चालू)



पुरुषोत्तम धाकस

# पोपट

ट्रामचा फाटा ओलांडून बाळू साठे चर्चगेट रेल्वे स्टेशनच्या रोखानें निघाला होता, पण तेवढ्यांत जी रूट बसच्या रांगेंत एक गुलाबी नमुना चमकला. आणि तत्काल बाळूच्या लक्षांत आलें, कीं गिरगांवांत बसनेंहि जातां येतें. आतां बसला पैसे जातील, पण इतक्या खुषीवर आणा-दोन आणे ओवाळून टाकायला काय हरकत आहे ? साहेब रात्रीं एकाएकीं वारल्यामुळें ऑफिसला सुटी मिळली होती. एखाद्या सुंदर फुलावर थोडा जास्त वेळ काढला तरी कांहीं बिघडणार नव्हतें.

मनांतला हिशेब पुरा होण्याच्या आंतच बाळू बसच्या रांगेंत शिरला. तें गुलाबी पातळ भारीपैकीं होतें. अलगद मागें येऊन बाळू उभा राहिला, आणि नमुना चाचपून पाहावा म्हणून बाळूनें एक इंग्रजी वाक्य हवेंत फेकून दिलें —" दीज् बसेस् आर् ऑल्वेज लेट्--व्हेन् यू वॉंट देम् बॅडली ! "

पण तें वाक्य निरुपद्रवी ठरलें. त्या गुलाबी पातळाला त्याचा स्पर्शहि झाला नाहीं. खोटा उंचावून बाळूनें कावळ्याच्या सफाईनें एकदां तो चेहरा डोळ्यांत आणण्याचा यत्न केला—पण त्याच वेळीं मागून एक कोकिळकंठी प्रश्न बाळूच्या कानांत घुसला—

" कुठं जायचंय् तुम्हांला इतक्या ब्याड्ली ? "

त्या आकस्मिक हल्ल्यानें बाळू इतका दचकला कीं मागें वळतांना त्याचें कोपर बाजूच्या कठड्यावर आदळलें, आणि त्यांतून एक जीव घेणारी कळ आली. कोपर दाबीत बाळूनें वर पाहिलें, आणि त्याचा चेहरा ब्रेक तुटलेल्या मोटारीसारखा वाकडातिकडा झाला. प्रश्न विचारणारी कोकिळा दुसरीतिसरी कोणी नसून बाळूच्याच ऑफिसांतली लतिका वागळे होती.

मिस् वागळे !--आकारानें बाळूच्या दुप्पट, मिजाशीनें सगळ्या खात्याच्या डोक्यावरून जाणारी—आणि नजरेवर साहेबालाहि शेळपट ठरवणारी ! घोटीव दगडासारखा तिचा भरगच्च बांधा आणि तीर फेकीत जाणारी लखलखती नजर हें बाळूच्या ऑफिसांतल्या तमाम पुरुषजातीला आव्हान होतें.

एका वेळीं दोन दोन पोरी फिरवणाऱ्या मीरचंदानीलाहि तिनें दाद दिली नव्हती. अनेक दिवस मीरचंदानी तिच्यासाठीं तडफडत होता. रोज संध्याकाळीं ऑफिस सुटल्यावर दोघांतिघांना घेऊन तो तिच्या वाटेवर हीरोसारखा उभा राही. पुढें पुढें ते रोज फाउंटन-पर्यंत तिला पोंचवायला जाऊं लागले. कशानेंच ती दाद देत नाहीं हें पाहिल्यावर मीरचंदानी एक दिवस दोस्तांना म्हणाला, " चलो, आज हमारे साथ और कोई नहीं आयेगा—बस्स—सिर्फ हम दोनों जायेंगे—वो और मैं ! "

त्याबरोबर पुढें गेलेली लतिका वागळे एकदम मागें आली.

मीरचंदानीच्या पुढ्यांत येऊन उमी राहिली. आणि हात त्याच्या पुढें करून पेटत्या डोळ्यांनीं म्हणाली, " चलो ! "

त्या आकस्मिक प्रतिहल्ल्यानें मीरचंदानी तिथल्या तिथें खलास झाला. तिच्या डोळ्यांतल्या आगींत होरपळून निघाला. आणि त्या दिवसापासून सर्वांच्या मतलबाची ती वाट बंद झाली.

बाळूनें त्या मतलबानें तिच्याकडे कधीं पाहिलेंच नव्हतें. नजरेच्या पहिल्याच फेरींत हिच्याशीं आपणाला कांहींहि कर्तव्य नाहीं, हें बाळूनें ओळखलें. बाळूच्या आटोपशीर जीवनांत एवढ्या मोठ्या मुलीला स्थानच नव्हतें. दूधवाल्या भय्याच्या भाषेत तो म्हणे, " लेना नहीं देना नहीं—फिर डर काहेकी ? "

आणि अखेर बाळूच्या ह्या निरपेक्ष दृष्टीनेंच लतिका वागळेशीं कसें वागावयाचें, हा ऑफिसांतल्या अनेक पुरुषांपुढें पडलेला प्रश्न सोडवला. बाळू शरिरानें एवढासा दिसला तरी जिभेचा तो भलताच तिखट होता. कांहींच काम नसलें कीं त्याचे दोस्त त्याच्या किरकोळ शरिरावर तुटून पडत, आणि चिडलेला बाळू मग त्यांच्या असेल नसेल त्यावर तुटून पडे.

परिस्थितीच्या या तीव्रतेंतूनच बाळूच्या जिभेला विलक्षण धार आली होती. मांजरीच्या शेपटीसारखी शत्रूच्या नुसत्या वासानेंसुद्धां ती सैल सुटे. बाळूला नुसतें म्हणायचें, " बाळू, अमुक अमुक इसम तुझी उगाचच बदनामी करीत होता ! " कीं बाळू उखडला. मग दयामाया न ठेवतां बाळू वाटेल तिथें त्या माणसाची अब्रू काढी. मीरचंदानीनें बाळूची ही नस बरोबर पकडली, आणि एक दिवस त्यानें बाळूला तिच्या नांवानें भडकवून दिलें.

मग मीरचंदानी, जेठावाला, दाबके वगैरेंनीं बाळूसाठीं एक झक्कास प्लॅन तयार केला. दोन दिवस खपून तो बाळूच्या जिभेवर उतरवला. बाळू म्हणेल त्या हॉटेलांत जेवण द्यायचें आश्वासन दिलें, आणि बाळू पेटला.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं साहेब केबिनमध्यें नसल्याची बाळूनें खात्री करून घेतली. मग तो मीरचंदानीच्या टेबलासमोर उभा राहिला, आणि कोपऱ्यांतल्या विश्वनाथ दाबकेला डोळा घालून म्हणाला,

" अरे शेर है जो शेर रहेगा--शेरनीकी पर्वा कौन करे ? खुबसुरती सामने आ जाये तो आँखें मिटाके क्या करें ? "

बाकीच्या तिघांनीं बाळूची ही कवाली उचलून धरली—आणि सगळें खातें तंग झालें. डोळ्यांसमोर चाललेल्या लूटमारीवर चरफडणाऱ्या निःशस्त्र पोलिस इन्स्पेक्टरच्या नजरेनें लतिका वागळे हें सगळें पाहत होती. पण बाळूच्या बेफिकीर नजरेवर ती आघात करूं शकली नाहीं. हळूहळू तिची नजर खालीं येऊन टेबलावरच्या चोपडींत शिरली, आणि बाळू साठेच्या दिशेला येईनाशी झाली.

त्या दिवसापासून बाळू मनांत येईल तेव्हां तिच्या वाटेला जात होता, आणि मान खालीं घालून ती दुसरी वाट धरीत होती. उघड शब्दांत बाळू तिचीं व्यंगचित्रें रंगवीत होता, आणि निमूटपणें ती तें ऐकून घेत होती. भेजा असेल तर मिस लतिका वागळेलाहि नरम आगतां येतें, हें आपलें म्हणणें बाळूनें सिद्ध करून दाखविलें होतें !

—आणि तीच लतिका वागळे फ्लोरा फाउंटनच्या बस-स्टॉपवर बाळूला इतक्या हळुवार, चॉकलेटी आवाजांत विचारीत होती, " कुठं जायचंय तुम्हांला इतक्या घँड्ली ? "

त्यामुळेंच बाळूचा घसा दाटून आला. आवंढा गिळून तो म्हणाला, "कुठं म्हणजे—इकडेच--या आपल्या--गिरगांवच्या बाजूला--"

तिनें विचारलें, "बाजूला म्हणजे नक्की कुठं ? कुठच्या स्टॉपला ?"

'कां ?' असा एक बंडखोर प्रश्न बाळूच्या डोक्यांत उठला, पण कांहीं तोंडांतून तो बाहेर पडेना. शेवटीं बाळू म्हणाला, " गिरगांवांत आमची मावशी असते--आज अनायासं सुटी मिळाल्येय् —"

" तिच्याकडे जायचंय तुम्हांला ! " बाळूचें म्हणणें तिनें पुरें केलें आणि विचारलें, " पण मावशी राहते कुठं—गिरगांवांत म्हणजे केळेवाडींत, मुगभाटांत, गायवाडींत—"

बाळू ओशाळून म्हणाला, " प्रार्थनासमाजच्या नाक्यावर. "

तशी लतिकानें विचारलें, " मग टॅक्सीनं जायचं कां ? "

" टॅक्सी ? " बाळू पुन्हा दचकला आणि म्हणाला, " टॅक्सी कशाला ?—बस येईल कीं थोड्या वेळांत. "

" पण तुम्हांला घँड्ली जायचंय् ना ? मग चला कीं टॅक्सींतून. "

बाळूच्या डोक्याचा गोंधळ उडाला होता. एकदां तिच्या चेहऱ्याकडे पाहण्याचा त्यानें प्रयत्न केला. पण त्याच वेळीं ती अशी छान हसली—अशी छान कीं बाळूला वाटलें सगळा भूतकाळ त्यांत एकदम गडप होत आहे. मागचेंपुढचें त्याला कांहीं दिसेनासें झालें. हळूच त्याच्या मनांत आलें, असेंच पुढें होऊन तिच्या त्या संत्र्याच्या पाकळ्यांसारख्या ओठांवर झडप घालावी. फ्लोरा फाउंटनच्या त्या प्रचंड बेटांत, भर दुपारच्या प्रहरीं आपण अशी उडी मारली तर काय होईल याचाहि त्यानें आंतल्या आंत अंदाज घेऊन पाहिला. पण मग तिच्या मागें वाढत चाललेल्या गर्दीकडे पाहून त्यानें मन आवरलें. लांबट चेहऱ्यानें तो म्हणाला, " टॅक्सी--म्हणजे तुम्हांला कुठं जायचं आहे ? "

" ऑपेरा हाउस--" ती म्हणाली, " तुम्हांला वाटेंत प्रार्थना समाजला उतरून मी पुढं जाईन ! "

बाळू विलक्षण पेंचांत पडला. आपलें एवढें हाडवैर विसरून हिनें भर रस्त्यांत आपल्याशीं अशी सलगी कां करावी ? आंतल्या आंत गुदमरलेला तो प्रश्न एकदम बाळूच्या चेहऱ्यावर उमटला. त्या तशा चेहऱ्यानें बाळूला तिच्याकडे बघतां येईना. म्हणून त्यानें नजर घड्याळावर नेली, आणि म्हणाला, " मला टॅक्सीनं येऊन जमणार नाहीं--मी असा ठाकुरद्वारवरून फिरत फिरत जाणार आहें—वाटेंत मला दोनतीन ठिकाणीं जायचं आहे. "

ती म्हणाली, " मग ठाकुरद्वारपर्यंत चला. मला टॅक्सी करायचीच आहे तीन माणसांचे पैसे मी त्याला देणार—मग ओळखीच्या माणसाला नेलं तर काय बिघडणार आहे ?--येणार तर चला. भुर्रकन् जाऊं पांच मिनिटांत ! "

आणि बाळू होय-नाहीं म्हणण्याच्या आंत तिनें समोरून जाणारी टॅक्सी थांबवलीसुद्धां. बाळूनें पाहिलें, मागच्या-पुढच्या सगळ्या माणसांची नजर त्याच्यावर खिळली होती. बाळूचें भाग्य कुणाच्याच डोळ्यांत मावत नव्हतें. ती गुलाबी पातळांतली लावण्यवतीसुद्धां बाळूकडे नजर पसरून बघत होती. त्यामुळें बाळूला लतिका वागळेच्या मागून जाण्याशिवाय मार्गच नव्हता.

बाळूनें हळूच एकदां चौफेर नजर फिरवली. आसमंतांत कुणी ओळखीचा प्राणी नाहीं याची खात्री करून घेतली, आणि मग तो बसच्या रांगेंतून बाहेर पडला. पण टॅक्सीजवळ येतांना एकदम त्याचें नाजुक शरीर एका अननुभूत जाणिवेनें शहारलें. त्या जाणिवेच्या तंद्रिनें त्याला घेरलें. मागून येणाऱ्या व्हिक्टोरियावाल्यानें शिवी दिली नसती तर त्या तंद्रींतच बाळूचा एवढासा जीव घोड्यांच्या टापांखालीं पडला असता. देहाची धनुकली करून तिथून तो कसाबसा निसटला.

बाळूला वाटलें, आपण आपलें पुढें ड्रायव्हरच्या बाजूला बसावें. पण मागच्या सीटचें दार उघडून लतिका वागळे सर्कशींतल्या चिनी बाईप्रमाणें उभी होती, आणि पोपटाप्रमाणें बाळूला ती पिंजऱ्यांत जायचा इशारा करीत होती. बाळूचा देह अधिकच आकसला आणि पोपटाच्याच हलक्या अंगानें तो टॅक्सींत शिरला.

ड्रायव्हरनें चावी फिरवली, आणि मग इंजिनाचा जो फरफराट झाला त्यांत सगळें जग दूर फेकलें गेलें. बाळू साठे आणि लतिका वागळे या दोघांत जी कांहीं दोनतीन बोटांची फट होती तीहि टॅक्सीनें एका वळणांत बुजवून टाकली. त्या रेशमी धक्क्यानें बाळूचें शरीर अगदीं पुलकित झालें. बाळूच्या आयुष्यांत तरुण मुलीचा तो पहिला स्पर्श होता. उष्णतेच्या असंख्य लहरींनीं त्याची छाती फुलून आली...पण वर छाती अशी फुललेली असतांनाच एकाएकीं खालीं पाय थडथडूं लागले. आणि बघतां बघतां पायांची ती थडथड वर येऊन फुललेल्या छातींत घुसली. खरें म्हणजे टॅक्सींतून लतिका वागळेबरोबर जायचें म्हटल्यावर तियेंच त्याच्या छातींत उष्णतेचा एक चमत्कारिक गोळा शिरला होता. आतां तो बेसुमार वाढला होता.

असें कां व्हावें हें बाळूला कळेना. वास्तविक आपल्या यादींतल्या किती तरी मुलींना कल्पनेंतून त्यानें माटुंग्यापासून कुलाब्यापर्यंत हवें तितकें फिरवलें होतें. चित्रपटांतल्या आपल्या आवडत्या नायकाप्रमाणें त्यानें कित्येकींना अकस्मात् बागबगीच्यांत गाठून गप्पा मारल्या होत्या, एकांत केला होता, कवेंत घेतलें होतें —गंमती गंमती केल्या होत्या.

पण ह्या वेळीं एकाएकीं मुलीला कह्यांत घेणारे ते आडाखे नि पवित्रे आठवेनासेच झाले. एकाएकीं त्याला तें नकोसेंच वाटूं लागलें. तिच्या त्या गडद हिरव्या जॉर्जेटच्या हुळहुळींत चकाकीनें रोज लांबूनच त्याचा श्वास गरम होत असे. पण आत्तां ती हुळहुळ अंगाला लागल्याबरोबर त्याचें मन एकाएकीं विरक्त बनलें. तिच्या अंगप्रत्यंगांतून येणाऱ्या सुगंधानें त्याचा श्वास गुदमरूं लागला. त्याची नजर तिच्या बाजूला जायलाच तयार नव्हती.—आणि अशा अवस्थेंतच तिनें विचारलें, "आतां कसं झक्क जमलं कीं नाहीं ?"

बेसावध बाळू म्हणाला, "हो ना !—" पण आपण कशाला हो म्हटलें हें त्याला कळलेंच नव्हतें.

आतां तिनें बैठक फिरवून तोंड बाळूच्या कानांजवळ आणलें, आणि बाळूनें आपला डावा खांदा आंत ओढून घेतला. पण या धडपडींत पायाच्या खोटा उचलल्या गेल्यामुळें सीटच्या पायथ्याशीं त्या थडथडूं लागल्या. बाळूनें पुन्हा बूट दाबून धरले, आणि पटकन् त्याची नजर लतिका वागळेकडे गेली. ती नजर तशीच पकडून तिनें विचारलें, "टॅक्सींतून असं फिरण्यांत मजा असते नाहीं ?"

असं म्हणजे कसं ?—पण बाळूला हें विचारण्याचें धाडस झालें नाहीं. तीच मग म्हणाली, "बसमध्यें आपल्याला असं जवळ बसायला मिळत नाहीं, आणि मिळालं तरी मोकळेपणानं बोलतां येत नाहीं—नाहीं ?"

पण तरीहि तिला नक्की काय म्हणायचें आहे याचा बाळूला नीटसा अर्थबोध झाला नाहीं. एकदां हळूच डोळ्याच्या कोपऱ्यांतून त्यानें तिच्या चेहऱ्यावर कांहीं दिसतें का तें पाहिलें आणि त्याला थोडें लाजल्यासारखें झालें. तिचा चेहरा भलताच लाडिक बनला होता. त्याच चेहऱ्यानें ती बाळूकडे पाहत होती. आणि बाळूच्या मनाचा यत्किंचित् विचार न करतां ती विचारूं लागली, "तुम्ही बोलत कां नाहीं ?"

ढोपरांची जुडी करून बाळू म्हणाला, "नाहीं-बोलत कुठें नाहीं ?—पण काय-म्हणजे तुम्ही बोलतां आहांत—"

"मी बोलतेंच आहें. पण तुम्ही कांहीं बोलाल कीं नाहीं !—कांहीं म्हणा, पण तुमचा रोजचा रुबाब आज दिसत नाहीं !" आणि मग म्हणाली, "मॅनेजरसाहेब वारले म्हणून तुम्ही नर्व्हस झालेले दिसतां !".

"छे छे छे ! छे—" स्वच्छ कपड्यांवर कुणी तरी शाई फेकावी तसें कांहीं तरी त्याच्या मनाचें झालें. तो म्हणाला, "तसं मुळींच नाहीं. हें आपलं तुमचं कांहीं तरीच ! मी तर उलट त्या दुखवट्यासाठींसुद्धां थांबलों नाहीं."

"हो, तुम्ही निघालांत तशी मीहि निघालें—"

"म्हणजे ?—" दचकून बाळूनें विचारलें.

"म्हणजे तेंच. तुम्हांला जसं ऑफिसमध्यें राहवलं नाहीं, तसं

## दीपावलीचीं पारितोषिकें

**दीपावली**च्या गेल्या वर्षांत प्रसिद्ध झालेल्या साहित्याबाबत—पारितोषिकांच्या योजनेप्रमाणें— असंख्य वाचकांचीं पत्रें येत आहेत त्यामुळें या महिन्यांत त्याचा निकाल जाहीर न करतां मे १९६० च्या अंकांत, यशस्वी वाचक आणि लेखक यांचीं नांवें जाहीर होतील.

मलाहि तें नकोसं वाटलं —ह्या एका तरी बाबतींत आपलं दोघांचं पटलं, नाहीं का ? ''

बाळूला नाहीं म्हणतां आलें नाहीं म्हणून तो नुसताच हसला. आणि केव्हांपासून त्याला पडलेल्या एका प्रश्नावर आला. ऑफिस-मधलें एवढें मोठें वैर विसरून ह्या मुलीनें आपल्याशीं ही लगट कां मांडली आहे ? आणि आतां तर ती म्हणत होती कीं आपलं दोघांचं एका बाबतींत पटलं !--म्हणजे इतर बाबींतसुद्धां असें पटावें अशी हिची इच्छा आहे कीं काय ?--पण दुसऱ्याच क्षणीं त्याचा त्यालाच तो प्रश्न मूर्खपणाचा वाटला. ही जहांबाज पोरगी दोघांतली एवढी मोठी तफावत अशी झटका आल्यासारखी उगाचच विसरणार नाहीं, एवढें बाळूला कळत होतें. तसा बाळू पक्का वस्ताद माणूस होता...

आणि मग एक विलक्षण शंका बाळूच्या डोक्यांत उतरली-- बाळूनें तिला सतवूं नये, उठल्याबसल्या चिडवूं नये, ऑफिसमधला तिचा छळ थांबवावा, यासाठीं तर तिची ही लगट नसेल ? —

विचाराचा हा धागा बाळूच्या हातांत आलेला असतांनाच ती म्हणाली, "आपण आतां असं करूं--टॅक्सी अशीच ऑपेरा हाऊसला घेऊं या. हॉटेलांत आपण फक्कडसा चहा घेऊं या--"

'' छे छे ! '' बाळूला हें सगळें कौतुक सहन होईना.

ती म्हणाली, '' छे छे नाहीं--आतां मी तुम्हांला अशी सोडणार नाहीं--'':

'' अहो पण--''

'' पण बीण कांहीं नाहीं--चहा घेतल्याशिवाय मी कांहीं तुम्हांला जाऊं देणार नाहीं ! ''

यावर बाळूला आढेवेढे घेणें अशक्यच झालें. आतां त्याची खात्रीच झाली कीं हा सगळा आग्रह केवळ त्याला खूप करण्यासाठींच होता. त्यानें तिच्या वाटेला जाऊं नये म्हणून ही लांच असली पाहिजे.

लतिका वागळेबरोबर हॉटेलमध्यें जाण्यांत जो और रुबाब होता त्यानें बाळूचें मन आंतल्या आंत पुलकित होऊन गेलें. मीरचंदानी आणि दाबके बाळूचा हा रुबाब पाहून त्याच्या नांवानें नक्कीच जळले असते. खरें म्हणजे टॅक्सींत तिच्या शेजारीं बसून चाललेल्या बाळूला त्यांनीं पाहायला हवें होतें. हें मनांत आलें, आणि बाळूनें मागें पुढें एकदां चौफेर नजरहि टाकून पाहिली. काय नेम सांगावा, बाळूला पाहून त्यांनीं एखाद्या टॅक्सींतून त्याचा पाठलागहि चालवलेला असायचा....

लतिका वागळेबरोबर टॅक्सींतून उतरतांना बाळूचा भाव एकदम वाढला. एकदम त्याच्या मनांत एक मजेदार कल्पना चमकली. त्याला वाटलें, आपण एक सुप्रसिद्ध पुढारी आहोंत, कसल्या तरी व्याख्यानासाठीं आपणाला मोटारनें आणण्यांत आलें आहे—आणि आपल्या दिमतीसाठीं लतिका वागळे ही स्वयंसेविका म्हणून बाहेर अदबीनें उभी आहे.

तेवढ्यांत मागून टॅक्सीचा ड्रायव्हर म्हणाला, '' संभालो साब—आगे गाडी है ! ''

बाळूनें दचकून चौफेर पाहिलें, पण गाडीबिडी कांहीं नव्हतें. मग बाळूच्या लक्षांत आलें कीं आपण फुटपाथवर आहोंत, आणि फुटपाथवर गाडी येत नाहीं. चिडून त्यानें ड्रायव्हरकडे पाहिलें, पण तो केव्हांच पसार झाला होता. बाळूच्या मग लक्षांत आलें कीं टॅक्सींत चढल्या-पासूनच तो ड्रायव्हर आपल्याकडे असाच हलकटपणानें पाहत होता.

हॉटेलच्या पायरीवर लतिका वागळे ताटकळत उभी होती. तिच्याकडे पाहून बाळूनें आपली चीड आवरली, आणि चौफेर नजर टाकून तो तिच्यामागून हॉटेलांत आला.

पार टोकाची अशी एक स्वतंत्र खोली पाहून ती बाळूला म्हणाली, '' या. ही रूम छान आहे--अगदीं एका बाजूला ! ''

त्या शब्दांनीं एकदम बाळूचा श्वास थोडा वर गेला. खोली छानच होती. प्रकाश निळसर होता, आणि मंद आणि चोरटा होता. चारी बाजूंना हिरव्या काचांचें पार्टिशन होतें, आणि त्यांतून पलीकडच्या रूममध्यें दोन अंधुक आकृति दिसत होत्या. झिरझिरीत वस्त्रांतल्या अवयवांबद्दल वाटतें तसें कांहीं तरी बाळूच्या मनाला चाटून गेलें.

मधली एक खुर्ची मोकळी टाकून बाळू लतिका वागळेपासून शक्य तेवढा दूर बसला. टेबलावरच्या पारदर्शक कांचेंत त्यानें हळूच एकदां तोंड पाहिलें, आणि एकाएकीं त्याचा रुबाब खालीं आला. आपला बुशशर्ट कमालीचा मळकट असून त्याची इस्त्रीहि साफ खलास झाल्याचें त्याला दिसून आलें. बटनांच्या पट्टीवरचे बोटांचे मळकट ठसे, आणि खिशावर पडलेले शाईचे डाग बाळूच्या चेह-ऱ्यावर उमटले. लतिका वागळेच्या झुळझुळीत रेशमी साडीकडे हळूच त्याची चोरटी नजर गेली—आणि मांजरीच्या तडाक्यांत सांप-डलेल्या उंदरासारखा तो आंतल्या आंत थिजून गेला.

'' काय घ्यायचं ? '' तिनें विचारलें.

'' कांहींहि—'' एकदम भानावर येऊन बाळू म्हणाला, '' आपल्याला फक्त चहा घ्यायचा. ''

'' चहा तर घ्यायचाच--पण कांहीं खायला नाहीं घ्यायचं ? ''

'' छे छे ! खायलाबियला कांहीं नको. ''

ती म्हणाली,''चहा म्हटला म्हणजे कांहीं चहाच नाहीं घ्यायचा.'' आणि मग बाळूकडे रोखून पाहत म्हणाली, '' मी कांहीं नुसता चहा

देण्यासाठीं नाहीं आणलं तुम्हांला एवढया ध्यानं !--बिस्किटं, केक असं कांहीं खायला हवं !—"

आणि बाळूकडे दुर्लक्ष करुन तिनें वेटरला ऑर्डर देऊनहि टाकली. वेटर गेल्यावर बाळूला ती म्हणाली, "तुम्ही फारच लाजतां बुवा !"

"छे छे ! लाजूं कशाला ?" बाळू जास्तच लाजून म्हणाला, "लाजत नाहीं कांहीं—"

"मग असं काय करतां ?—आणि तुम्हीं असं आखडल्यासारखं काय बसलांत ?" मग डोळे बारीक करुन ती म्हणाली, "ऑफिसमध्यें साहेब नसल्यावर तुम्ही कसे बसतां—टेबलावर तंगड्या टाकून साहेबासारखं !"

"तें आपलं ऑफिसमध्यें—इथें हॉटेलांत —"

"मग हॉटेल असलं म्हणून काय झालं ? इथं तर तुम्ही एकदम मोकळं असायलं हवं—" आणि तोंड किंचित् पुढें आणून तिनें विचारलें, "इथं आपल्या दोघांशिवाय कोण आहे ?"

त्या प्रश्नानें बाळू चरकला. तिच्याशीं बोलतांना त्याला पुन्हा पुन्हा तिच्याकडे पहावें लागत होतें. तसें पाहतांना सारखा त्याचा श्वास छातींत अडकत होता. तिथल्या एकांतांत, त्या निळसर, चोरट्या प्रकाशांत लतिका वागळेचे पुष्ट अवयव फारच बोटीव आणि टवटवीत बनले होते. आणि त्यांना चुकवण्यासाठीं त्याची नजर उजव्या बाजूच्या पार्टिशनकडे जात होती. पण कांचेंतून दिसणाऱ्या त्या दोन व्यक्ती तिकडेहि धड पाहूं देत नव्हत्या.

केकनीं भरलेलीं एक मोठी बशी आणि वेफरची पुडी वेटरनें आंत आणून ठेवली, आणि बरोबर पाण्याचे ग्लास ठेवून तो निघून गेला. केकची बशी बाळूकडे सरकवून ती म्हणाली, "घ्या ना."

बाळूनें कांहीं न बोलतां वरचाच एक केक उचलला.

तशी ती म्हणाली, "तुम्ही बोलत नाहीं कांहीं—"

"नाहीं—म्हणजे काय बोलायचं—"

"काय म्हणजे ?—अशा एकांतांत तरुण मुलीशीं काय बोलायचं असतं ?" असें म्हणून तिनें आपले काळेभोर डोळे बाळूच्या नजरेंत घुसवले, आणि म्हणाली, "ऑफिसमध्यें तुम्ही किती छान बोलत असतां ! तुमचं बोलणं इतकं मजेशीर असतं—ऑफिसांतल्या एकालाहि बोलतां येत नाहीं तसं--बाकीचे सगळे शेळपट वाटतात. मला तुमच्या बोलण्याची स्टाइल फार आवडते. कुणाची भीड नाहीं--कुणाची फिकीर नाहीं--रोखठोक ! मला असा बेफिकीर पुरुष फार आवडतो !"

आपण काय ऐकतों आहोंत हें बाळूला कळत नव्हतें. थंडीच्या कडाक्यांत गार पाण्याच्या झोताखालीं सापडल्यासारखा तो आखडून गेला होता. तरीहि ती म्हणत होती, "तुम्ही केक खात नाहीं ?"

बाळू हातांत केक घेऊन तसाच बसला होता. त्या प्रश्नानें तो एकदम सावध झाला. त्याला ती इष्टापत्ति वाटली. आपलें तोंड त्यानें केक खाण्यांत गुंतवून टाकलें.

हातांतला केक संपल्यावर बाळूनें पाहिलें, तिनें क्रीम भरलेला एक भला मोठा केक बाळूसमोर धरला होता. तिच्याकडे न पाहतांच बाळूनें तो घेतला, आणि मान खालीं केली.

तशी नाजुक आवाजांत ती म्हणाली, "तुम्ही अजूनहि लाजतां-हात !—पण खरंच, असं लाजतांना तुमचा चेहरा किती गोड दिसतो—बघा, पुन्हा लाजलांत तुम्ही !"

खरी गोष्ट अशी होती कीं गडबडींत केकचा बराच मोठा भाग बाळूच्या तोंडांत गेला होता, आणि तें दिसूं नये म्हणून त्यानें तोंड दाबून धरलें होतें.

तेवढ्यांत तिनें विचारलें, "बरी आठवण झाली, तुम्ही नाटकांत कामं करतां का ?"

"मी ?" तोंडांतला घास न गिळतांच बाळू ओरडला. "छे छे ! नाटकबिटक तसलं कांहीं नाहीं—"

"पण खरं म्हणजे तुम्हीं केलं पाहिजे—तुम्हांला विनोदाचं तें सेन्स फार चांगलं आहे. तुमचा चेहरासुद्धां कमालीचा आकर्षक आणि बोलका आहे !"

बाळूला कोरड्या केकचा घास लागत होता, आणि दर घासागणिक तो पाणी ढोशीत होता. पण लतिका वागळे आपली बोलतच होती, "डाव्या अँगलनं तुमचा चेहरा इतका छान वाटतो—असं वाटतं तेवढ्याचाच फोटो काढून जवळ ठेवावा !"

बाळू यावर काय बोलणार ? त्यानें आपलें हसल्यासारखें केलं आणि हळूच बशींतला आणखी एक केक उचलला.

बाळू खात होता, नि ती त्याचं वर्णन करीतच होती. मग ती हळूच बाळूच्या अगदीं जवळ आली, आणि म्हणाली, "तुमचा आवाजसुद्धां इतका छान आहे--त्या दिवशीं ऑफिसमध्यें तुम्हीं ती कवाली म्हटली ना ?--मला ती इतकी आवडली--'शेर है जो शेर रहेगा—' पुढं काय तें ?"

आतां मात्र बाळूचा चेहरा बदलला. हातांतला केक हातांत तसाच राहिला, आणि एकाएकीं मेलेल्या नजरेनें तो कोपऱ्यांत पाहूं लागला. ओढून टाकलेल्या सिगरेटच्या थोटकावर नजर खिळवून बसला.

त्याच वेळीं खालीं बाळूच्या पायावर एकदम तिचें नाजुक गरम पाऊल पडलें, आणि बाळू दचकून वर-खालीं झाला.

पण दुष्टपणें तिनें विचारलें, "तुम्ही गप्प गप्प कां ?–तुम्हांला माझं बोलणं आवडत नाहीं का ?"

"छे, छे !—" पण बाळूच्या तोंडून पुढें शब्दच फुटेना. . .

"मग बोलत कां नाहीं तुम्ही ?–आम्हीं आपलं एकट्यानंच बोलायचं नि तुम्हांला त्याचं कांहींच नाहीं--"

तें ऐकतांना बाळूची नजर एकदम त्याच्या काबूंतून सुटली, आणि थेट तिच्या डोळ्यांत गेली. तिनें ती पकडली आणि बाळूला विचारलें, "इतकं काय आहे माझ्यांत पाहण्यासारखं ?"

त्या प्रश्नानें बाळूची नजर पटकन् ग्लासांतल्या पाण्यांत पडली. त्याच्या शरिरावर कांटा उभा राहिला. पण तरीहि बाळूवरची नजर ती काढीत नव्हती. एकटक बाळूकडे ती पाहतच राहिली.

तिच्या त्या एकटक पाहण्यानें बाळूच्या पोटांतून कसला तरी गोळा उठला, आणि छातींत जाऊन बसला. तें दडपण बाळूच्या शरिराला सहन होईनासें झालें.

तिची नजर चुकवतां चुकवतां बाळूची नजर पार्टिशनच्या काचेंत भरली--पण पलीकडच्या दोन व्यक्ती अगदीं एकमेकांना भिडल्या होत्या. तें पाहतां पाहतां बाळूचा आपल्या हातापायांवरचा ताबा सुटला, भयानक उष्णतेचा लोटच्या लोट त्याच्या शरीरांत मावेनासा झाला, आणि तो लोट दाबून धरतां धरतां त्याचे हातपाय वेगानें थरथरूं लागले.

आपली ही चमत्कारिक स्थिति लतिका वागळेच्या ध्यानांत येऊं नये, म्हणून बाळू आपलें डोकें पुन्हा पुन्हा तिच्या आड आणीत होता. पण त्यांत बाळूला यश आलें नाहीं. तिनें तें पाहिलेंच. बाळूची थरथर पाहून तिचे डोळे विचित्रपणें चमकले. बाळूच्या डोळ्यांतली ती गडबड तिनें अचूक पकडली, आणि एकदम पुढें येऊन बाळूचा नाजुक, थरथरता हात तिनें हातांत घेतला. तो सरळ दाबून मोठ्या प्रेमळ स्वरांत तिनें बाळूला विचारलें, "आपण करा-यचं का तसं ?" आणि आपली सगळी मादकता डोळ्यांत आणून तिनें बाळूला विचारलें, "असं काय करतां ?--मी तुम्हांला आवडत नाहीं का ? नुसतेच पाहात काय बसलां आहांत ?"

आतां मात्र बाळूची सहनशक्ति संपली. शरीरावरचा ताबा सुटला, आणि तें सगळीकडून थरथरूं लागलें. मोठा जोर करून बाळूनें खसकन् आपला हात तिच्या हातांतून सोडवून घेतला. असला फाजीलपणा बाळूला मुळींच खपणारा नव्हता.

या धडपडींत खालीं पडलेली बॅग त्यानें उचलून घेतली, पण एकदम झडप घालून तिनें ती काढून घेतली. पटकन् बाळूचे दोन्ही हात पकडले, आणि खेचून त्याला जवळ घेत ती म्हणाली, "त्या दिवशीं मीरचंदानी तुम्हांला म्हणत होता, लतिका वागळे आपली आहे--त्यावर तुम्ही त्याला म्हणालांत, आपणाला मधून-मधून थोडा थोडा शेअर पाहिजे !—आठवतं ?" आणि बाळूची नजर आपल्या उभार स्तनांच्या कक्षेत आणून तिनें विचारलें, "आज लतिका वागळे आपण होऊन जवळ आली आहे, दुसऱ्या कुणाचा 'शेअर' नाहीं--आणि तुम्ही असं काय करतां ?--याऽना !—"

या आकस्मिक हल्ल्यानें एकाएकी बाळूची वाचा बसल्यासारखी झाली. सगळें शरीर थरथरूं लागलें. तोंड पिवळें निळें पडलें. शेवटीं सगळें बळ एकवटून त्यानें कसाबसा हिसडा दिला, आणि आपले हात आधीं मोकळे करून घेतले आगि पुढें स्पष्ट बोलला नाहीं तरी मनांतल्या मनांत तो जळफळत सुटला, 'फाजील, निर्लज्ज, हलकट, बदमाष, जहांबाज...'

पण बाळूच्या शिव्या संपल्या तरी ती तशीच निर्लज्जपणें हसत राहिली होती. तशी बाळूनें मान वर न करतां सरळ बॅग उचलली, आणि खाडकन दार उघडलें. मग मात्र तिचा नाइलाज झाला. पटकन् पर्स उचलून ती बाळूच्या पुढें झाली, आणि अगदीं बाळूची बायको असल्यासारखी मान खालीं घालून चालूं लागली.

काउंटरवर आल्यावर झटकन् बाळूला अडवून तिनें विचारलें, "थांबा कीं, बिल नको का द्यायला ?"

नाइलाजानें बाळू कोपऱ्यांत उभा राहिला. हळूच एकदां त्यानें हॉटेलभर नजर फिरवली, आणि खालीं आणून बुटाच्या उडालेल्या पॉलिशवर थोपवून धरली.

लतिका वागळे मागें आली, आणि जांभळ्या कागदांतलीं दोन लांबसडक चॉकलेटें बाळूसमोर धरून म्हणाली, "घ्या !"

बेसावध बाळूनें नाईलाजानें तीं दोन्ही उचललीं. तशी ती म्हणाली, "हं--दोन्ही नाहींत हं तुम्हांला !" आणि त्यांतलें एक उचलून म्हणाली, "हें एक माझा धाकटा भाऊ आहे ना, त्याला हवं !"

मग पायऱ्या उतरून तिनें बाळूचा निरोप घेतला; निर्लज्जपणें हंसत विचारलें, "अच्छा, आतां पुन्हा कधीं भेटायचं ?"

इथें मात्र बाळूनें स्वतःला सावरलें. त्यानें हातहि उचलला नाहीं, कीं तिच्याकडे ढुंकून पाहिलें नाहीं. आणि तिची पाठ वळतांच हातांतलें चॉकोलेट त्यानें डाव्या हातच्या गटारांत भिरकावून दिलें.

--आणि त्याच वेळीं मागून बाळूच्या कानांत एक हलकट शब्द घुसला--"टाटा !"

०७०

---

( पान २१ वरून चालू )

न्यूटनचें पुस्तक दुर्मिळ आहे. त्याचें व्यक्तिमत्वहि मनाला गोंधळून टाकणारें आणि संमिश्र असें आहे. अशा चित्रकाराची आजच्या पिढीला कांहीं माहिती नसावी हा एक उपरोधच आहे. परिस्थिति आतां बदलते आहे. युरोपअमेरिकेकडे पाठ फिरवून न्यूटन भारतांत परत येणें कधीहि शक्य नसलें तरीं ज्या भारता-विषयीं तो इतक्या ढोबळपणें लिहितो त्या विषयीं तो पुढेंमागें जास्त खबरदारी घेत लिहील अशी आशा बाळगायला हरकत नाहीं. कलावंतावर कोणत्याच व्यक्तीचे वा देशाचे हक्क असूं नयेत. आणि आत्मचरित्रात्मक लिखाणांतून विशद होणारें न्यूटनचें व्यक्तिमत्व पाहिलें तर आपणा भारतीयांचासुद्धां त्याच्यावरील हक्क नाममात्र आहे हें समजावयास अडचण पडणार नाहीं.

०७०

कधीं कोठें घडला नव्हता, कधीं घडूंच शकला नसतां, घडलाच असता तर ज्याचें समाजानें त्वरित व कठोर असें दमन केलें असतें, असा प्रकार मुंबईस उघड्या मैदानावर घडूं शकला. सहस्रावधि माणसांनीं तो पाहिला व सहन केला. समाज निःसत्व व निशक्त झाल्याचें हें अचुक चिन्ह आहे.

# चुंबन चर्चा



— पु. भा. भावे

दिनांक ६ जानेवारी दिवशीं मुंबईच्या ब्रॅबोर्न क्रीडांगणावर एक विलक्षण घटना घडली. ऑस्ट्रेलियन चमूंविरुद्ध चमकदार फलंदाजी करणाऱ्या अब्बास अली बेग ह्या हिंदुस्थानी खेळाडूवर एक तरुणी इतकी कांहीं लट्टू झाली कीं, तिनें धांवत जाऊन ह्या छोकऱ्याची भराभर चुंबनें घेतलीं. तिनें त्याच्या गळ्यांत हार घातला, हात घातला व पन्नास सहस्र प्रेक्षकांच्या साक्षीनें भर मैदानावर त्याचे पटापट मुके घेतले. एकाद्या लेखकानें ह्या प्रकारचा प्रसंग आपल्या कादंबरींत रंगविला असता, तर त्याच्यावर निश्चितच "अवास्तवतेचा" आरोप झाला असता. एकाद्या दिग्दर्शकानें असें दृश्य पडद्यावर चित्रित केलें असतें, तर अश्लीलतेच्या पदवीस तो निश्चित पात्र ठरला असता. परंतु एकाद्या कादंबरींत अथवा चित्रकथेंतहि असंभवनीय, अश्लाघ्य व अश्लील वाटावा, असा हा प्रसंग मुंबापुरींत घडून गेला. ब्रॅबोर्न स्टेडियमच्या व हिंदी क्रिकेटच्याहि इतिहासांत हा प्रसंग अगदीं अपूर्व असल्याची साक्ष प्रस्तुत सामन्याचे धांवतें समालोचन करणाऱ्या श्री. विजय मर्चंटसारख्या जुन्या खेळाडूनेंहि दिली आहे. मुंबापुरीसारख्या बहुरंगी व बकाल नगरांतहि पूर्वी जें कधीं घडलें नव्हतें, तें आतां घडलें. ज्या प्रकारचा सीमेपार जाणारा "षट्कार" आजवर कुठल्याहि तरुणीनें मारला नव्हता, त्या प्रकारचा मर्यादा मोडणारा फटका आज एका क्रीडासक्त तरुणीनें मारलेला आहे. खेळाच्या मैदानावर मोठ्या अनावर आवेगानें दौडत जाऊन तिनें बेगमियाची प्रकटपणें चुंबनें घेऊन टाकलीं. बेगमियाचा पराक्रम सार्थकीं लागला. पाहाणाऱ्यांचें डोळे निवले. बेगपेक्षांहि मोठा पराक्रम त्या धाडसी बालिकेनें करून दाखविला. तिनें एक नवेंच "क्रांति-कारक" कृत्य केलें. गुणग्रहणाच्या एका अफलातून पद्धतीचे तिनें अनावरण केलें. रसिकतेचे एक नवेंच पर्व तिनें सुरू केलें. एक नवाच पायंडा पाडून ठेवला. भारतांतील "नवी स्त्री" प्रसंगी केवढें धाडस करूं शकते, स्वतःला ती किती विसरूं शकते, दुसऱ्याला किती विसरूं शकते, अगदीं देहभान विसरून प्रसंगी ती पराक्रमाला कोणतें पारितोषिक देऊं शकते, गुणांचे ती कसें कौतुक करते, ह्याचा साक्षात्कार ह्या साहसी व साहसप्रिय मुलीनें घडविला. बेगमियांना तिनें धन्य केलें! त्यांच्या क्रीडापटुत्वाला धन्य केलें! ब्रॅबोर्न क्रीडांगणाला धन्य केलें! त्या क्रीडांगणावर जमलेल्या सहस्रावधि प्रेक्षकांना धन्य केलें! स्वतःला धन्य केलें! ह्या खेळाडू स्त्रीनें एक नवाच विक्रम प्रस्थापित केला. जे कुणी कधी केलें नव्हतें, तें तिनें केलें. जे कुणी कधीं पाहिलें नव्हतें, तें तिनें दाखविलें. तेवढ्याच पैशांत दाखविलें.

पोरसवदा बेगला हा अनुभव कसा वाटला कोणास ठाऊक. पडदपोशींतल्या पोरी धांवत धांवत जाऊन एकाद्या खेळाडूवर चुंबनांचा मारा करूं लागल्या, तर ते त्याच्या इस्लामी मनाला मानवेल किंवा कसें कुणास ठाऊक. बेगला कदाचित् स्वतःविषयीं वाईट वाटलें असेल. कदाचित् त्याला रामनाथ केणीविषयीं वाईट वाटलें असेल. कारण रामनाथ केणी बेगच्या जोडीनें खेळत होता. केणीचा पराक्रम बेगपेक्षां रतिभरहि कमी नव्हता. बेग अखेर बाद तरी झाला. पण केणी मात्र अखेरपर्यंत बाद झाला नाहीं. त्यांच्या निर्दोष खेळाचे

तोंडभर कौतुक मर्चंटसारख्या मुरब्बी खेळाडूनें केलें. पण त्या रसिक मुलीची कृपादृष्टि केणीवर वळली नाहीं. तिनें "तोंडभर" कौतुक केलें तें वेगचें. अखेर आवड,गोड असते हेंच खरें !

परंतु आवड दाखविण्याची ही विशिष्ट पद्धत योग्य आहे का ?. आमच्या पोरीबाळींना एखादा खेळाडू आवडला, एखादा नट आवडला, एखादा सैनिक अथवा लेखक आवडला, कुणाहि पुरुषाचे कुठल्याहि क्षेत्रांतलें कर्तृत्व आवडलें तर त्यांनीं तडक धांवत जाऊन त्याचें चुंबन घ्यावयाचें काय ?

ब्रेबोर्न स्टेडियमवरील "त्या" बालिकेनें आपलें "ह्या" विषया-वरील मत सक्रीय व्यक्त केलेंचे आहे. तिनें बापड्या वेगचें चुंबन घेऊन टाकलें. हा प्रकार एका तरुण मुलीनें एका तरुण खेळाडूच्या विषयांत केला. वेग बिचारा निरपराध होता. चांगला खेळ हाच त्याचा एकमेव अपराध होता. ह्या पोरीला त्यानें ( बहुधा ) कधीं पाहिलेंहि नव्हतें. तिच्या वाटेवर तो कधीं उभा राहिला नव्हता. तो कधीं तिच्या वाटेला गेला नव्हता. त्यानें कधीं तिला चिठ्ठ्याचपाट्या पाठविल्या नव्हत्या. मग "धक्का" देण्याची गोष्ट तर दूरच राहिली. वेगला "धक्का" दिला तो तिनें ! हा धक्का देतांना तिनें वेगच्या भावनांचा विचार केला नाहीं. त्याच्या कीर्ति अपकीर्तिचा विचार केला नाहीं. त्याची आवड-नावडहि विचारांत घेतली नाहीं. बिचारा असंरक्षित, हतबल, गांगरलेला पुरुष ! त्याला एकटा गांठून ह्या मुलीनें त्याच्यावर हा असा प्रसंग आणला. तिनें त्याचें खुशाल चुंबन घेऊन टाकलें. कल्पना करा, हाच प्रयोग उलट्या प्रकारें झाला असता तर ? हेंच चित्र उलटें फिरलें असतें तर ? एका मुलीनें एका मुलावर आक्रमण करून त्याचें चुंबन घेण्याऐवजीं एका मुलानें एका मुलीचें चुंबन घेतलें असतें तर ?—तर आमच्या विदुषींनीं त्याच्यावर मनसोक्त तोंडसुख घेतले असते. पुरुषजातीच्या अमर्याद उच्छृंखलतेचे त्यांनीं वाभाडे काढले असते. वृत्तपत्रांतील पत्रव्यवहाराचे स्तंभ. निषेधाच्या आरोळ्यांनीं डोक्यावर घेतले असते. परंतु एरवी निषेधाच्या निमित्ताला टेकलेला आमचा नवनारी समाज आज मूग गिळून गप्प आहे. कारण हा जो ( अति ) प्रसंग घडला, त्याची नायिका एक मुलगी आहे. कदाचित् त्यांची अपेक्षा अशी असेल, कीं ह्या प्रका-राचा निषेध करावयाचाच, तर तो आतां पुरुषांनीं केला पाहिजे. कारण येथें झालाच असला, तर एका पुरुषाचा मर्यादाभंग एका स्त्रीकडून झालेला आहे. हा मामला मर्यादाभंगाचा आहे असेंहि कदाचित् कांहीं पुरोगामी प्रमदांना वाटणार नाहीं. त्यांना इतकें वाटेल, कीं एका खेळाडू मुलीनें आपल्या प्रामाणिक भावना निर्भयपणें व्यक्त करून टाकल्या. पण भावना व्यक्त करण्याचा हा मार्ग श्रेयस्कर आहे का ?

गंभीरपणें विचार करण्यासारखा हा प्रश्न आहे. हिंदुस्थानांत जन्मलेली एक मुलगी अगदीं निश्शंकपणें एका अपरिचित पुरुषाचें चुंबन घेण्याइतपत धृष्ट बनते. ह्याचा अर्थ काय ? चुंबन ही गोष्ट ह्या देशांत इतकीशी स्वस्त मानली जात नाहीं. कुठलीहि क्षणिक अथवा उडती भावना...एवढेंच नव्हे, पण कुठलीहि उत्कट अथवा प्रगाढ भावनाहि सार्वजनिक चुंबनानें व्यक्त करण्याची पद्धत ह्या देशांत नाहीं. उलटपक्षीं ह्या प्रकारचें चुंबन हिंदुस्थानांत हीन मानलें जातें, अशिष्ट मानलें जातें, निर्लज्जपणाचें मानलें जातें. ह्या देशां-तील हिंदू, मुस्लीम अथवा काळे ख्रिस्तीदेखिल ,सहसा प्रकटपणें चुंबनांची खैरात करीत नाहींत. पाश्चात्यांप्रमाणें येतां जातां चुंबनांची देवाण घेवाण करण्याची रीत ह्या देशांत नाहीं. येथें प्रकट चुंबनें केवळ लहान मुलांची तेवढीं घेतलीं जातात. आया आपल्या मुलांची चुंबनें घेतात, ती एका विशिष्ट वयोमर्यादेपर्यंत. बहिणी येथें कधीं आपल्या भावाचे मुके घेत नाहींत. आणि पती पत्नींच्या चुंबनांना तर एकांताविना दुसरा साक्षीदारच नसतो. उघडेपणानें करण्याच्या ह्या गोष्टी नव्हत, असेंच येथें मानलें जातें. कुठलीही शारीरिक सलगी करण्यासाठीं अशी सलगी करणाऱ्या दोन माणसांत कांहीं एक नातें असावें लागतें. हे नातें व ह्या नात्याचे चुंबनासारखे आविष्कार प्रदर्शनीय नव्हत, अशीच ह्या देशाची धारणा आहे. नागडें प्रदर्शन ही वस्तुतः एक प्रकारची पशुताच आहे. आणि ह्या प्रकारची पशुता भारतीय परंपरेस मान्य नाहीं. भावनेची अभिव्यक्ती अनेकदां शारीरिक कृतीनें करावयाची असते, हें खरें आहे. भावनेचा एखादा उमाळा असा असतो कीं, एखाद्या शारीरिक कृतीनें त्याला वाट दिल्याविना माणसाला चैन पडत नाहीं. वनवासाहून परत आलेल्या रामाला मिठी मारल्याविना भरताला चैन पडणार नाहीं. फार दिवसांनीं भेटणाऱ्या पतीपत्नींनाहि परस्परांना मिठी मारावीशीं वाटेल. पण पतीपत्नींनीं आपल्या ह्या कोमल व उत्कट भावनेचा आविष्कार चारचौघांत करणें ह्या देशांत



## अगीनगाणें

अंधरांतून फुलतें फुलतें
लाल विजेचें अगीनगाणें
आभाळाच्या ओठावरती
थरथरणारें आगदिवाणें
अगीनगाणें...लाल किरमिजी
पारा जळतो शब्दांमधूनी
ढगांढगांतिल निळाजांभळा
आशय भिजतो वादळ पिऊनि
अगीनगाणें चमकावित ये
कडाडणारी तान रुपेरी
भयानकाचा उठे शहारा
मृद्‌गंधाची मूक लकेरी.

—पुष्पा त्रिलोकेकर

---

प्रशस्त मानलें जात नाहीं. त्या भावनेलाहि आमच्या संस्कृतीनें संयमाच्या मर्यादा घालून दिल्या आहेत. कुठलीहि भावना अखेर संयमानेंच शोभिवंत दिसते. जी अनावरपणें धिंगाणा घालीत सुटेल, ती भावना सुसंस्कृत माणसाची नव्हे. वेळींअवेळीं व स्थळकाळाची तमा न बाळगतां होणारी शारीरिक लगट ही तर निश्चितच असंस्कृत मनाची द्योतक होय. शरिराचे अकारण प्रदर्शन व दोन शरिरांची अनावर लगट श्रेयस्कर कशी मानता येईल ? कुठलीहि किरकोळ भावना चुंबनानें व्यक्त करण्याची पाश्चात्यांत पद्धत आहे. अगदीं साधा निरोप घेतां-घेतांनाहि ती माणसें परस्परांचे मुके घेतात. अर्थात् त्या मुक्यांतहि कपोल चुंबन, ओष्ठ चुंबन ह्यासारखे भेद; प्रसंगपरत्वें अधिकारपरत्वें व तेथें केले जातात. तरीहि एकंदरींत त्या मंडळींचा चुंबनावर विशेष भर आहे.

दोन माणसांची शारीरिक सलगी घडवून आणणाऱ्या ह्या क्रियेला तेथें एखाद्या उपचाराचें स्वरूप प्राप्त झालें आहे. परंतु "पुढारलेल्या" राष्ट्रांनीं स्वीकारलेला हा उपचार शारीरिक दृष्ट्या फारच पुढारलेला असला, तरी तो सांस्कृतिक व अनेक दृष्टींनीं फारच मागासलेला आहे. येता जातां कुठल्याहि जुजबी भावनेच्या प्रकटीकरणासाठीं शरीरावर भर देणें, ही गोष्ट मुळांतच मागासलेपणाची आहे. तशांत तसाच कांहीं संबंध अथवा प्रसंग असल्याविना दोन माणसांनीं परस्परांच्या शरीरांना फार निकटचा स्पर्श करणें, ही तर संस्कृती-हीनतेची सीमा आहे. आरोग्याच्या, सौंदर्याच्या वा शुचितेच्या मूल-भूत कल्पनांशी हें कृत्य फार विसंगत आहे. कुठल्याहि दोन माण-सांचीं शरीरें आपआपल्या दृष्टीनें फार पवित्र, पण दुसऱ्याच्या दृष्टीनें फार अपवित्र व अशुद्ध असूं शकतात. नव्हे तीं तशी असतातच. म्हणूनच हिंदू परंपरेनें भावनेच्या किरकोळ आविष्कारांसाठीं शरीरावर भर दिलेला नाहीं. शरीरें आवरण्याची, भावनांचें उदात्तीकरण कर-ण्याचीच शिकवण आम्हांस मिळालेली आहे. म्हणूनच आमचे नमस्कार चमत्कार घडतात. ते दुरून हात जोडून. कुणाहि भल्या माणसाच्या कसल्याहि बऱ्यावाईट हातांत हात देणें देखील आम्ही टाळलेलें आहे. मग चुंबनासारख्या फाजील लगट करणाऱ्या शिष्टाचाराची गोष्ट कशाला ! हा शिष्टाचार मुळांतच आम्हाला अशिष्ट, अशुद्ध व असंस्कृत वाटतो, आणि तो तसा आहेहि. म्हणूनच आम्ही चुंबन हा एक सवंग उपचार केलेला नाहीं. चुंबन आम्ही करता येईल तेवढें दुर्मिळ करून ठेवलें आहे. आणि तें आम्ही फार दुर्मिळ केलें आहे, म्हणूनच फार सुंदर करून ठेवलें आहे; फार आकर्षक करून ठेवलें आहे. फार पवित्र देखील मानलें आहे. आणि आमच्या परंपरेनें चुंबनासारख्या सलगीच्या क्रियेवर जीं बंधनें घालून ठेवलीं आहेत, तीं सर्वतोपरीं उपकारक अशीच आहेत. चुंबनाइतकी निकटची शारीरिक क्रिया फार सवंग झाली, तर ती निरर्थक ठरेल, इतकेंच नव्हे तर अनर्थकारक ठरण्याचाहि संभव आहे. सहजा-सहजीं दिलें घेतलें जाणारें चुंबन हे मनाची व शरीराची संवेदना मारणारे आहे. ते उघड्या प्रदर्शनवादाचे पोषण करणारें आहे. शारीरिक प्रदर्शनवाद हे सुसंस्कृतीचें लक्षण नव्हे, ह्याचा आमच्या नव्या पिढीस झपाट्यानें विसर पडला आहे. आमच्या "नव्या स्त्री" चें झपाट्यानें होणारे "वेषांतर" हे ह्या प्रदर्शनवादाचेच फार सवंग व फार भयंकर असे गमक आहे. शरीर झांकण्यापेक्षां शरीर उघडें टाकण्यावरच तिचा कटाक्ष आहे. गाढ भावना सखोलहि असते. उत्कट प्रेम संयमीहि असते. सौन्दर्य झांकण्यानेंच जातीवंत सौन्दर्याचें दर्शन घडत असतें. भावनांचा सार्वजनिक बाजार मांडणें, शरीराचें उघडे-नागडें प्रदर्शन करणें हें त्या भावनांसच फार अपमानकारक व मारक आहे. उत्तम संस्कृतीस, सूक्ष्म संवेदनेस, अथवा विलोभनीय शिष्टाचारास शोभादायक असा हा प्रदर्शनवाद नव्हे. पण ह्या प्रदर्शनवादानें आमच्या तरुण मुलींनाहि किती झपाटलें आहे, याचें प्रत्यंतर ब्रेबोर्न स्टेडियमवरील "त्या" चुंबनानें दिलें. केवळ दृष्टीनेंहि जी भावना सांगता येते, टाळ्या वाजवून जी भावना व्यक्त करता येते, शब्दांनीं जी आवड दाखवितां येते, ती आवड प्रगट करण्यासाठीं ह्या मुलीनें चढाईखोर चुंबनांचा उघडावाघडा प्रयोग करून टाकला. हा प्रयोग क्रीडांगणावर जम-लेल्या सहस्रावधि प्रेक्षकांनीं मुकाट्यानें पाहिला. शांतपणें सहन केला. हा प्रयोग पाहून कुणी सुन्न झाले, कुणी स्तब्ध झाले, कुणी सुखावले, कुणी दुखाविले. पण हा प्रयोग होत असतांना स्वस्थ मात्र सारेच बसले. तिनें जसें धडाक्यानें आपल्या भावनेस कृतीचें रूप दिलें, तसें कृतीचें रूप तेथें जमलेल्या प्रेक्षकांनीं आपल्या भावनेस मात्र दिलें नाहीं. त्याच्या विषयींच्या भावनेस दिलें नाहीं—तिच्या विषयींच्या भावनेस दिलें नाहीं. मुंबईचा प्रेक्षक एकंदरींत सहनशील खरा. कारण ह्या आगाऊ व अमर्याद चुंबनाचे पारितोषिक त्या पराक्रमी पोरीला जागच्या जागीं देईल, असा प्रेक्षकवर्ग ह्या हिंदुस्थानांतील अन्य कांहीं नगरांत आजही विद्यमान आहे. कुणी सांगावें तिच्या ह्या अपूर्व साहसावर प्रसन्न होऊन तिचीच चुंबनें घेण्याची इच्छा कांहीं

प्रेक्षकांना झाली असती. बोलून चालून हा भावनेच्या आविष्काराचाच प्रश्न होता. तिनें जर आपल्या भावना मनसोक्त व्यक्त केल्या, तर अन्य माणसांना तिनें कोणत्या तोंडानें थांबविलें असतें ! मुंबईच्या प्रेक्षकांनीं तिला तसें थांबविलें नाहींच. पण अन्य कांहीं नगरांत मात्र तिची अन्य प्रकारें संभावना होण्याचा दाट संभव होता. ह्या मुंबईतच प्रस्तुतचा पराक्रम कांहीं वर्षांपूर्वी खपला नसता. ह्या प्रकारचें शतकृत्य अगदीं गोलपिठा-फोरास रोड संस्कृतीच्या बायांनीहि आजवर येथें केलें नाहीं. क्रिकेटचे क्रीडांगण हें ह्या प्रकारच्या क्रीडोन्मादाचे स्थान नव्हे, हे त्यांनाहि ठाऊक होतें. पन्नास सहस्त्र प्रेक्षकांच्या साक्षीनें एकाद्याचे प्रगट चुंबन घेण्याचा अत्याचार त्यांचेहि हातून कधी घडलेला नाहीं. वर्तनाची कांहीं पथ्यें त्यांनीहि पाळलीं, अन्य माणसांच्या भावनांविषयीं आदर दर्शविला. परंतु सन्मान्य संकेतांचा दुसऱ्याच्या भावनांचा वा मूलभूत बऱ्या वाईटाचा विचार ह्या चुंबन-प्रिय बालिकेला नुसता शिवला देखिल नाहीं. तिला वेगळा खेळ आवडला, व प्रदर्शनवादी उथळपणें तिनें त्याचें चुंबन घेऊन टाकलें. आतां चांगला खेळ खेळणाऱ्या, चांगले गाणें म्हणणाऱ्या, चांगला अभिनय करणाऱ्या, एवढेंच काय पण नुसतें चांगलें दिसणाऱ्या बायकांची चुंबनें घ्यावयास आमच्यातले उल्लू पुरुष मोकळे झाले. काय चिंता आहे ! चुंबनांचा राजमार्ग मुलीनेंच एकदां मोकळा केल्यावर आतां पुरुषांना लाजण्याचें कारण काय ? आणि स्त्रीयाच हट्टाला पेटल्यावर पुरुषांच्या लाजण्याचा उपयोग किती ? आज एका स्त्रीनें एका पुरुषाचें चुंबन घेतलें, उद्यां कुणाहि पुरुषानें कुणाहि स्त्रीचें चुंबन घ्यावें !—अमुकच स्त्रीचें चुंबन घ्यावें असेंहि नाहीं. अमुक स्थळीं घ्यावें असेंहि नाहीं. व अमुक कारणासाठीं घेतलें पाहिजे असेंहि नाहीं ! कौतुक वाटलें, आवड उत्पन्न झाली, त्या आवडीला वाट करून दिली. कुणा स्त्रीनें कलात्मक वेषभूषा केली—घे तिचें चुंबन ! कुणी स्त्री गोड बोलली—घे तिचें चुंबन ! कुणी स्त्री बोललीच नाहीं--घे तिचें चुंबन ! चुंबनाची चाल स्त्रीनेंचे पुढाकार घेऊन एकदां सुरू केल्यावर तिचे लोण पुरुषांपर्यंत पोचण्यास. उशीर किती ? स्त्रियांच्या प्रदर्शनवादी वेषभूषेनें, आविर्भावांनीं व वागण्या-बोलण्यानें आजचा "नवा" पुरुष आधींच चेकाळला आहे. त्यांत सार्वजनिक चुंबनांच्या मुक्त प्रथेची मुभा मिळाल्यास काय कहर होईल ह्याची कल्पनाच केलेली बरी. स्त्रीचा लगट करणारा उघडा-वाघडा प्रदर्शनवाद हां हां म्हणतां पुरुषास झपाटून टाकील. ह्या वाढत्या प्रदर्शनवादाच्या भयानक प्रतिक्रिया नव्या पिढीच्या वर्तनांत आजच पहावयास मिळतात. स्त्रीच प्रदर्शनवादी बनल्यावर पुरुष निलाजरा न बनल्यास नवल. ह्या निला-जरेपणाचा उपसर्ग सभ्य (पण जुनाट !) स्त्रियांना आजच असह्य होऊन बसला आहे. त्यांत ह्या चुंबनाच्या विकारानें पुरुषवर्गाला एकदां पछाडलें, तर संभावित स्त्रियांना जगणेंच कठीण होऊन बसेल ! अर्थात जातीच्या निर्ल-ज्जाविषयीं कांहीं बोलणेंच नाहीं.



काय म्हणालांत, माझं तोंड वाघासारखं दिसतं ?

परंतु ज्यांना कांहीं लाजलज्जा, सारासार विचार आहे, त्यांनीं मुंबईस घडलेल्या अभूतपूर्व व भयसूचक घटनेचा फार गंभीरपणें विचार केला पाहिजे. कारण एका मुलीनें घेतलेलें हें चुंबन एका प्रवृत्तीचें द्योतक आहे. ही प्रवृत्ती अनिष्ट आहे व आमच्या दुर्दैवानें सर्व समाजांत वाढत्या प्रमाणावर आहे. उथळ, उनाड, समाजघातकी व असंस्कृत असा प्रदर्शनवाद हें ह्या प्रवृत्तीचें वर्णन आहे. ह्या प्रवृत्तीचा एकच प्रकट साक्षात्कार आज मुंबईस घडला असेल पण ह्या रोगट व प्राणघातक प्रवृत्तीचे विषजंतु साऱ्या समाजशरीरांत झपाट्यानें पसरत आहेत. कधीं कोठें घडला नव्हता, कधीं कोठें घडूच शकला नसता, घडलाच असता तर ज्याचे समाजानें त्वरित व कठोर असे दमन केले असते, असा प्रकार मुंबईस उघड्या मैदाना-वर घडूं शकला. सहस्त्रावधि माणसांनीं तो पाहिला व सहन केला. समाज निःसत्व व निशक्त झाल्याचे हें अचुक चिन्ह आहे. एका पसरूं पहाणाऱ्या रोगाचा हा उद्रेक आहे. हा प्रकार अपवादात्मक आहे अथवा अपवादात्मक राहील अशा भ्रमांत कोणी राहूं नये. मुंबई बन्दरांत उपटलेला हा रोग हळूहळू देशभर पसरण्याचा पुष्कळ संभव आहे. आमच्या समाजानें अनेक पथ्यें सोडलीं, संस्कार सोडले, विधिनिषेध सोडले, मूलभूत मूल्यांचा विचार सोडला. हितकारक अशा सामाजिक रूढी व संकेतांचा गेल्या कांहीं दशकांत आंधळे-पणानें त्याग केला. त्याचे परिणामहि आज आम्ही भोगत आहोंत. आमचा समाज अशक्त, विस्कळीत, बोथटलेल्या भावनेचा, कुठ-ल्याहि मानबिंदूस पारखा, कृतिहीन, निष्ठाहीन व श्रद्धाहीन असा बनला आहे. स्त्रियांच्या मर्यादाभंगाचे, त्यांच्यावरील आक्रमणाचे व त्यांच्या निघृण हत्येचेंहि प्रमाण सारखें वाढतच आहे. सुसंस्कारांना मुकलेलीं, विधिनिषेधांना पारखी, अशीं सुशिक्षित म्हणविणारी माणसेंच हे किळसवाणें अत्याचार करीत असल्याचें दृश्य आपण पहात आहोंत. मर्यादेचे, संकोचाचे बंधन सोडलेली आजची स्त्री संकटाच्या गर्तेकडे सहजासहजीं ओढली जात आहे. सगळ्याच रुढी व सारेच संकेत कांहीं स्त्री पुरुषांस जाच करण्यासाठीं उत्पन्न झालेले नाहींत. स्त्रीपुरुषांस संरक्षण देणें, सावध ठेवणें, त्यांच्याच हितासाठीं बऱ्यावाईटाच्या कांहीं अटळ मर्यादा घालून ठेवणें हा अनेक संके-तांचा व रुढींचा फार उपकारक असा उद्देश आहे. ह्या उद्दिष्टांशीं बेगमियाचें चुंबन घेणारी ती तरुणी सहमत नसेल. पण समाजांतील स्त्री पुरुषांचें हित, स्वास्थ्य व सुख कुठल्या संकेतांत, रुढींत व आचार विचारांत आहे, याचा विचार करण्याची वेळ आतां निश्चितपणें आलेली आहे. हा विचार आम्ही आतां तांतडीनें केला तरी त्या अफाट मुलीनें बेगमियाचें घेतलेलें अनावर चुंबन कारणीं लागलें, असें म्हणतां येईल.

•••



अनुक्रमणिका

एक पानी कथा

# अटळ

अलिअलिकडेच पंतांनीं पेन्शन घेतलं होतं. पेन्शन घेतलं होतं खरं पण नोकरींत असतांना त्यांच्या अंगवळणी पडलेल्या संवयी मात्र अजून तशाच होत्या. अजूनहि, कारण नसतां, ते पूर्वीसारखेच लौकर उठत. लगबगीनें तोंड धूत. चहा पीत. टाईम्स वाचीत. तेव्हां त्यांचा मोठा मुलगा त्यांना म्हणे, "अण्णा, तुम्हीं सकाळीं एवढ्या लौकर उठतां; मग फिरायला कां जात नाहीं कुठं ?" त्यावर ते नुसतेच हंसत व म्हणत "आतां आयुष्याचे उरलेले दिवस ह्या घरांत निवांतपणें बसून काढूंद्यात कीं मला. अरे, आम्हीं पेन्शनींत निघालेलीं माणसं. आतां फिरायचं कुणासाठीं नि कशासाठीं ?" दुपारी बाहेर रणरणणारं ऊन त्यांना असह्य होई. नळावरून येणारे धुर्णी आपटल्याचे आवाज त्यांच्या कानांना नकोसे वाटत. पंतांना वाटे : असंच उठावं, ऑफिसांत जावं नि साहेबाला म्हणावं, काय वाटेल ते करा पण मला पेन्शनींत काढूं नका. मला परत कामावर घ्या. मला पेन्शनींत जायला सांगितलंत तर मी मरेन. माणसाला जशी हवा, माशाला जसं पाणी तसं कारकुनाला हपिसचं काम... अन् मग त्यांना नकळतच ते पेंगूं लागत. मग पंत लगबगीनें उठत नि कपडे करतां करतां सैंपाकघराकडे वळून म्हणत, "मी जातों बरं का ? दाराची कडी घ्या लावून." मी जातों बरं का याचा अर्थ मी राममाऊंकडे बुद्धीबळं खेळायला जातों,असा आहे हें पंतांच्या बायकोला ठाऊक होतें.पंतांचा दुपारचा चहा रामभाऊंकडेच होई संध्याकाळीं सात साडेसातच्या सुमारास पंत परत घरीं येत तेव्हां सगळीजणं घरांत असत. मग अकरा साडेअकरा वाजतां अंथरुणावर आडवं होईपर्यंत पंतांचा वेळ चुटकीसरखा निघून जात असे.

मग हा नवा कार्यक्रम पंतांच्या प्रकृतीला मानवला नाहींसें दिसतें. तसें कांहींही कारण नसतां, त्यांची प्रकृति आतां आंतून भराभर पोखरत चालली होती. आतां आपण फार दिवस कांहीं या जगांत काढीत नाहीं अशी खूणगांठ त्यांनीं केव्हांच मनाशीं बांधून ठेवली होती. आपल्या बरोबरीचेच कितीतरी लोक पेन्शन घेतल्याबरोबर चारदोन वर्षांतच कसे आटोपले होते हें त्यांनीं पाहिलं होतं.

पण पंतांना इतक्यांत मरायचं नव्हतं. चाळीस वर्षांची नोकरी केल्यासारखं दहा-पंधरा वर्षे तरी पेन्शन नको का एखाद्यानं भोगायला ?

पण एक दिवस पंत जें टाळायला पहात होते तेंच नेमकं घडून आलं. रोजच्यासारखे रामभाऊंकडे जाऊन ते आले नि बाहेरच्या नळावर पाय धुवायला म्हणून गेले. तिथं त्यांना त्याच मरण भेटलं.

पंतांचं मरण पंतांना म्हणालं, "पंत, चला."

पंतांनीं विचारलं, " तूं कोण रे बाबा ?"

मरण म्हणालं, " मला....मला तुम्हीं ओळखलं नाहीं ?"

पंतांनीं डोळे किलकिले करून मरणाकडे पाहिलं पण त्यांना कांहीं ओळख पटली नाहीं.

" पंत, अहो मी...मी तुमचं मरण."

मरण ?.. मी तुमचं मरण ?...पंतांचे हात-पाय लटपटूं लागले. सर्वांगाला घाम फुटला.

तसेच घाबऱ्याघुबऱ्या ते घरांत आले नि खुर्चीवर उकीडवे बसून राहिले.

थोड्या वेळानं त्यांचा मोठा मुलगा ऑफिसांतून आला त्याला ते म्हणाले : " मी उद्यां सकाळच्या बोटींत रत्नागिरीस जात आहे. मला थोडे पैसे दे असतील तर."

हें एकदम रत्नागिरीला जायचं खूळ यांच्या मनांत काय आलं तेंच त्याला कळेना. त्यानं पुन्हां पुन्हां पंतांना विचारून पाहिलं. पण एक नाहीं नि दोन नाहीं. ' मला जायलाच हवं' एवढंच ते म्हणाले नि गप्प बसले.

रात्रीं ते परसाकडेला गेले तेव्हांहि त्यांचं मरण नळाच्या धक्क्यावरच बसून कसलातरी विचार करीत बसलेलं त्यांना दिसलं. पण त्याच्याकडे त्यांनीं ढुंकूनहि पाहिलं नाहीं.

दुसऱ्या दिवशीं बोटींत चढतां चढतां, मोठ्या मुलाला त्यांनीं सर्व प्रकार सांगितला नि ते म्हणाले : " कांहींहि करून मला माझं मरण टाळलंच पाहिजे. माझं मरण मुंबईलाच आहे असं दिसतं. तेव्हां मी आतां यापुढं मुंबईला कांहीं येणार नाहीं."

अशा रीतीनं पंतांनीं आपल्या मरणाला चकविलं नि ते रत्नागिरीला गेले.

त्याच दिवशीं संध्याकाळीं, ऑफिसांतून परत आल्यावर पंतांचा मोठा मुलगा नळावर पाय धुवायला म्हणून गेला, तेव्हां पंतांचं मरण धक्क्यावर बसलेलं त्याला दिसलं.

" कोण रे तूं ?"

" कोण ? मी !"

" हो, तूं..."

" मी पंतांचं मरण."

" मग इथं काय करतो आहेस ?"

" पंतांची वाट बघतों आहे."

" का रे बाबा तूं आमच्या अण्णांच्या पाठीस असा हात धुवून लागला आहेस ? आत्तां कुठं त्यांनीं पेन्शन घेतलं आहे. जरा दहा-पंधरा वर्षे विश्रांति घेऊं दे कीं त्यांना."

"मी तरी काय करूं रे ? माझं काम मला नको का करायला ? माझीहि नोकरीच आहे. मलाहि माझ्या वरिष्ठांचं-यमाचं-ऐकायला हवं.

" पण अण्णा इथं आहेतच कुठं मुळीं ?"

" म्हणजे ? काल तर इथं होते !"

"आज सकाळींच ते तुला फसवून रत्नागिरीस गेले."

" खरंच ?...खरंच ?...पंत रत्नागिरीस गेले ?"

बोलतां बोलतां पंतांच्या मरणानं टुण्‌दिशीं उडी मारली नि आनंदानं ते नाचूं बागडूं लागलं.

" हें काय ?" पंतांच्या मुलानं विचारलं.

" चला, मी एका काळजींतून सुटलों."

" कसल्या ?"

"पंतांच्या प्राक्तनांत त्यांचं मरण रत्नागिरी मुक्कामीं आजच रात्रीं व्हायचं असं लिहिलेलं आहे. कालपर्यंत ते इथंच होते नि त्यांचं रत्नागिरीला जायचं कांहींच लक्षण दिसत नव्हतं. मला काळजी पडली होती कीं—"

बोलतां बोलतां पंतांचं मरण दिसेनासं झालं नि त्यांचा मोठा मुलगा, सुन्न होऊन तें गेलं त्या दिशेनं आ वासून पहात राहिला.

***

सदानंद रेगे


भारतीय शेतकरी-६
"माझ्या बागायतींतील बरकतीचें कारण-
किर्लोस्कर एंजिन!"
श्री. उटगे
पोस्ट: येणेगुर
ता. उमरगा, जि. उस्मानाबाद
ता. ७-८-१९५९
म. किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लि; पुणें यांसी,
स. न. वि. वि.
सुमारें नऊ वर्षांपूर्वी मीं आपलें किर्लोस्कर ५ हॉर्सपॉवरचें एंजिन नं. १२६५९६ ता. १२-३-५१ रोजी खरेदी केलें. मराठवाडा विभागांतील उमरगा तालुक्यांत किर्लोस्कर एंजिन विकत घेण्याचा उपक्रम माझाच! साहजिकच मी संशयानें थोडासा ग्रासलों होतों.
आतां लिहिण्यास आनंद व अभिमान वाटतो कीं या दिवसापर्यंत माझें किर्लोस्कर एंजिन बिनतक्रार काम देत आहे. एवढेच कीं एंजिनाच्या ओव्हरहॉल व दुरुस्तीसाठीं या नऊ वर्षांत मला फक्त रु. ४०० खर्च आला बाकी कोणत्याहि एंजिनाला ओव्हरहॉलिंग लागतेंच!
किर्लोस्कर एंजिन कोणत्याहि परदेशी एंजिनाइतकेंच सरस आहे अशी माझी खात्री पटली आहे. आपण तर किर्लोस्कर एंजिनावर खूष आहोंत. या एंजिनाचें वैशिष्ट्य म्हणजे याला तेलाचा खर्च कमी येतो. शिवाय तें चालू असताना त्यावर मुद्दाम देखरेख ठेवावी लागत नाहीं.
या एंजिनाबाबत तक्रार करावी असें कारणच नाहीं. मात्र माझ्या बागायतीमधील बरकतीचें किर्लोस्कर एंजिन हें वरिष्ठ प्रमुख कारण ठरलें आहे.
आपला विश्वासु
(शांतलिंगप्पा गुरसिद्दप्पा उटगे)
" किर्लोस्कर -
एंजिनांची गरज
किर्लोस्कर
एंजिनेंच
भरून काढतात!"
KOE
किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लि., खडकी, पुणें ३

अनुक्रमणिका

ज्ञान मग तें कोणत्याहि विषयाचें असो, तें जितक्या प्रमाणांत निर्दोष असेल तितक्या प्रमाणांत तें पवित्र ठरतें. चिकित्साशून्य भाविकपणा खऱ्याखोट्याच्या कणखर विवेकाला थारा देणारा नसतो आणि म्हणूनच लोकमुखांतील भाकडकथांना लोकभ्रमाच्या सदरांत ढकलावें लागतें...

# ऐतिहासिक लोकभ्रम



— न. र. फाटक

ऐतिहासिक लोकभ्रम या शब्दांचा अर्थ इतिहास-काळांतील लोकभ्रम असा नसून इतिहासांतील घटनाविषयीं समाजामध्यें खऱ्या म्हणून मानल्या जाणाऱ्या चुकीच्या कल्पना असा अर्थ घेतला पाहिजे, म्हणजे पुढील विवेचनाबद्दल वाचकांच्या मनांत घोटाळा उद्भवणार नाहीं. इतिहासकाळाची मर्यादा इंग्रजी राज्याच्या प्रारंभापर्यंतची समजावी. साधारणपणें १८२० इ. स. या वर्षी हा प्रारंभ झाला. पेशवाईला कायमचें खग्रास ग्रहण लागेपर्यंत साऱ्या देशावर इंग्रजांचें राज्य प्रस्थापित झालेलें नव्हतें. पेशवाई संपल्यावरहि पंजाब, सिंध हे प्रांत स्वतंत्र राहिले, परंतु येथें प्राधान्यानें महाराष्ट्रापुरता विचार कर्तव्य असल्यानें त्या प्रांताची १८५० पूर्वीची स्वतंत्रता प्रस्तुत लेखाला बाधक ठरण्याचें कारण नाहीं.

दंतकथा ही इतिहासाची जन्मभूमि असल्यामुळें इतिहासांत लोकभ्रमाचा शिरकाव होणें स्वाभाविक आहे. आपल्या देशांत होऊन गेलेल्या घडामोडी जशाच्या तशा जेव्हांच्या तेव्हां लिहून ठेवण्याचा प्रघात प्रबळ नसल्यानें ताम्रपत्रें, शिलालेख, नाणीं वगैरे साधनें हुडकून काढून त्याच्या आधारें गतकालीन राजवंश आणि एकंदर लोकस्थिति यांची तुटक अपुरी माहिती जुळवून इतिहासाची उभारणी इंग्रजी राजवटींत होऊं लागली. इतिहास लेखनाचा प्रघात नव्हता या विधानाला 'राजतरंगिणी' 'पृथ्वीराज विजय', इत्यादि सारख्या कांहीं काव्यांची अपवादादाखल नांवें घेतां येतील. त्यांत 'राजतरंगिणी' हेंच इतिहास या नांवाला शोभते. जीं काव्यें आहेत, त्यामध्यें कथाविषय खुलविण्यासाठीं कवींनीं मनःपूताला सपाटून अवसर दिलेला असतो व त्यायोगानें त्यांत मूळ वस्तुस्थितीचा पुष्कळसा लोप किंवा विपर्यास होतो, हें जाणत्यांना सांगायला नको. इतिहासविषयाच्या काव्यांतच नव्हे तर पौराणिकविषयांच्या काव्यांतहि हीच कवीच्या अनावर मनसोक्ताची तऱ्हा पहायला सांपडते. महाभारतामधील कथानकावर 'भारत चंपू' या नांवाचें एक काव्य रचलें गेलें आहे. त्यांत कौरवपांडवांच्या नगरीच्या वर्णनांत त्या नगरींतील इमारतींची उंची सूर्य-चंद्राच्या गतीला अडथळा करणारी होती असें कल्पून कवीनें त्या उंचीवर कोट्या केलेल्या दृष्टीस पडतात. संस्कृत कवींचा हा प्रकार पुढें मराठी भाषेंतील कवींनी चोखाळला यांत नवल नाहीं. काव्यें इतिहासविषयासंबंधीं असलीं तरी ऐतिहासिक वस्तुस्थितीच्या बिनचूक आकलनाला त्यांचा उपयोग फारसा होऊं शकत नाहीं. अर्थात् अशीं काव्यें बाद करावी लागतात. पुण्याच्या भांडारकर प्राच्यविद्या संशोधक मंडळाच्या महाभारताकडे पाहिल्यास त्या ग्रंथाच्या मूळ रचनेंत किती फेरबदल बारंवार होत गेले याचा अंदाज करतां येतो. एकच उदाहरण द्यावयाचें तर तें द्रौपदीवस्त्रहरणाचें आहे. द्रौपदीच्या वस्त्रहरणाचा प्रसंग मूळ महाभारतामध्यें नव्हता, पण हल्लीं तो इतका लोकप्रिय झालेला आहे कीं, तो नव्हता हें सांगण्याचीसुद्धां चोरी वाटावी. रामायणाची संशोधित आवृत्ति अजून बाहेर आलेली नाहीं, पण जें रामायण प्रचलित आहे, त्यांत 'अहल्या शिळा राघवें उद्धरीली' या कल्पनेला आधार सांपडत नाहीं. अहल्येला शिळारूप आलेलें नव्हतें. जेथें शापाचा प्रसंग घडला तेथेंच बहुत वर्षें आपल्या पापाच्या प्रायश्चित्ताचें तप करीत असतां ती इतकी रोडावली होती कीं जवळ जवळ ती दिसेनाशीच झाली होती. अशा अवस्थेंत रामानें विश्वामित्राच्या सांगण्यावरून तिच्या तपश्चर्येचा शेवट केला; या रोखाची कथा रामायणांत आहे. परंतु रामभक्तांना हा मूळचा वृत्तान्त मिळमिळीत वाटून त्यांनीं दगडाला सजीव स्त्रीचे रूप देण्याची अद्भुत कल्पना निर्माण केली व तीच आज नितांत लोकप्रिय आहे.

रामायण भारत सोडून त्या अलीकडच्या काळांतील एखादें उदाहरण द्यावयाचें झाल्यास तें उज्जयनीच्या विक्रमराजाचें आहे. या राजाच्या नांवानें 'संवत्' संज्ञेची कालगणना चालू आहे. कांहीं वर्षांमागें 'संवता'नें दोन हजार वर्षांची मजल पुरी केल्यामुळें संवत्कर्त्या विक्रमाच्या जयजयकाराची लाट

देशभर उसळली. एकीकडे जयजयकार चालू असतां विक्रम व त्याचा संवत यांच्या वस्तुस्थितीविषयीं नाणावलेल्या संशोधक विद्वानांनीं वाद उपस्थित केला. वादाचा इत्यर्थ विक्रम आणि त्याचा संवत् यांना भक्कम ऐतिहासिक पुरावा नाहीं, अशा रोखाचा होता. प्रस्तुत वादाला जें उत्तर दिलें जात होतें, त्यांचा भर निरनिराळ्या दंतकथांशिवाय दुसरा नव्हता. विक्रमच झाला नसेल तर त्याचा दरबार, त्या दरबारांतील कालिदासादि नवरत्नें या कथा सपशेल बनावट ठरतात व तशा त्या बनावट असल्याचें इतिहाससंशोधकांनीं जनतेच्या निदर्शनासहि आणलेलें आहे. विक्रमाच्या अनुषंगानें माळव्यांतील धारा नगरीच्या भोजराजाचा निर्देश उचित होईल. विक्रमाच्या दरबारी पकडींतून संशोधकांच्या प्रयत्नानें निसटलेला कालिदास या भोज राजाच्या दरबारांत पुढें उण्यापुऱ्या हजार वर्षांनीं प्रगटला, अशी आख्यायिका आहे. भोजराजाच्या कोषांतील कविवर्गांत कालीदासाच्या जोडीनें भवभूति हा कवि आढळतो. या संबंधाचा 'भोजप्रबंध' नांवाचा एक लहानसा ग्रंथ आहे त्यांत पुष्कळ मनोरंजक गोष्टी आहेत व त्यांतच कालिदासभवभूतीचें समकालीनत्व दाखविलेलें दृष्टीस पडतें. त्या गोष्टींनें करमणूक साधते, कांहीं गोष्टींतून मार्मिक बोधही आढळतो परंतु ऐतिहासिक वस्तुस्थितीशीं त्या गोष्टींचा संबंध नाहीं. लोकमुखांतून घोळल्या जाणाऱ्या कथांचा तो संग्रह आहे. लोकमुखांतील निराधार कथांना खरे मानून चालण्याच्या प्रकारांनाच लोकभ्रमाच्या सदरांत ढकलावें लागतें.

भोजप्रबंधाच्या मासल्याचें इतिहासकाळीं मराठी भाषेंतहि पुष्कळ लिखाण झालेलें आहे. रामदास, तुकारामांचीं चरित्रें ज्यांनीं दोनशें अडीचशें वर्षांपूर्वी लिहून काढलीं, त्यांना त्या पुरुषाविषयींची आपली भक्ति साजरी करायची असल्यानें त्यांनीं जें ऐकलें, सुचलें तें लिहून काढलें. रामदासांच्या उत्सवांत एकनाथांनीं सुद्धां कीर्तन केल्याचें एक समर्थ चरित्रकार सांगतो. (समर्थ जन्मापूर्वी एकनाथाच्या मरणाला दहा वर्षे लोटलीं होतीं) तुकोबांच्या चरित्रांत अशाच विचित्र गोष्टी घुसल्या आहेत व त्या रूढ आहेत म्हणून त्यां खऱ्या समजाव्या असें अट्टाहासानें बोलणारा फार मोठा समाज भेटतो. महीपतीनें संतचरित्रें लिहिलीं, त्यांत तुकोबांचें विस्तीर्ण चरित्र आहे. 'महीपती तुकोबांच्या मागून सवाशेंदीडशें वर्षांनीं झाला, एवढ्यासाठीं त्यानें जमविलेली संतचरित्राची सामग्री खोटी म्हणण्याचा आजच्या लोकांना काय अधिकार?' असा वितंडवाद करणाऱ्या व्यक्ति आज थोड्या थोडक्या नाहींत. परंतु महीपतीमध्यें चरित्र लिहिण्यास लागणारी योग्यता होती कीं नव्हती, त्यानें चरित्रासाठीं जी सामग्री गोळा केली, तिचें स्वरूप कसें आहे, या प्रश्नांचा विचार वितंडवाद्यांना नसतो. कोणी खोलांत शिरून महीपतीच्या चुका दाखवूं लागल्यास त्यांच्या वांटणीस धिक्कार येतो. संतचरित्राचे अर्वाचीन संशोधक महीपतीवर अप्रामाणिकपणाचा आरोप करीत नाहींत. तथापि प्रामाणिक माणसें विश्वसनीय असतातच असा नियम किंवा अनुभव नाहीं. तो पराकाष्ठेचा भाविक-भावडा होता व चिकित्साशून्य भाविकपणा खऱ्याखोट्याच्या कणखर विवेकाला थारा देणारा नसतो. भाविकपणाला जें पोषक असेल तें ग्राह्य, मग तें खरें असो वा खोटें असो, किंबहुना भाविकामध्यें खरें खोटें पारखणारी दृष्टीची प्रखरता नसते. श्रद्धा व तीहि आंधळी या भांडवलावर महीपतीनें संतचरित्रें निभावून नेलीं; एवढेंच संशोधक म्हणतात. पुढच्या कीर्तनकारांनीं तीं चरित्रें त्यांत आपल्या पदरचें कांहीं भरतीला घालून वाढविलीं; कीर्तनाच्या हजारों हजार श्रोत्यांच्या पिढीदरपिढींत तीं चरित्रें स्थिरावलीं, म्हणून त्यांचा आदर केलाच पाहिजे अशी प्रवृत्ति लोकभ्रमांच्या मुळाशीं असते. पूर्वी लोकभ्रमांना बळकटी आणणारा हरिदास पुराणिकांचा एकच वर्ग होता. हल्लीं हरिदास पुराणिक मागासले तर सिनेमा, नाटकें, काव्यें, कादंबऱ्या हीं साधनें त्यांची जागा त्यांच्याहून किती तरी अधिक प्रभावानें भरून काढीत आहेत. लोकांत चालणाऱ्या भ्रमांच्या संपादणीत पुष्कळदां एक मनोरंजक मुद्दा ऐकायला सांपडतो. 'तुम्ही ज्याला भ्रम ठरवूं पहातां तो समज अमक्यातमक्यानें ठासून उभारला आहे; त्यांच्याहून तुम्ही शहाणे कीं काय? त्यांच्याहून तुम्ही स्वतःला शहाणे मानीत असाल तर तुम्ही वेड्यांच्या इस्पितळांत रहाण्याच्या लायकीचे आहां.' असा अडाणी रोखठोकीचा प्रतिवाद लोकभ्रमाचें निरसन करूं इच्छिणारांच्या समोर उभा केला जातो. अशा प्रतिवादाची 'तान् प्रति नैष यत्नः' या न्यायानें उपेक्षा करणें उत्तम. वस्तुतः भ्रमांचें निरसन ही साध्या शहाणपणाची चढाओढ नसते. ती संशोधनाच्या परिणामीं समोर येणाऱ्या नव्या जुन्या पुराव्याची साधक बाधकतेची शहानिशा असते. नवा सबळ पुरावा पुढें आला असतां त्याला डावलण्याची प्रवृत्ति ही ज्ञानाच्या वाढीला मारक असते.

संतचरित्रांच्या बाबतींत विश्वसनीयतेच्या दृष्टीनें जी दुर्दशा अनुभवास येते तीच दुर्दशा राजकीय विषयांच्या-चरित्रें किंवा प्रसंग-बाबतींत घडलेली आहे. शिवछत्रपतींचें चरित्र सात आठ बखरींतून आलेलें आहे. त्यांत त्र्यंबकेंच विश्वसनीय असें एखादें चरित्र आहे. बाकीच्यांतून कित्येक असंभाव्य कोटींतल्या भाकडकथा वाचाव्या लागतात. हिंदूंच्या मानानें मुसलमानांनीं इतिहासाचें मर्म जास्त अवगत असल्यानें त्यांनीं लिहिलेल्या बखरी (तवारिखा) मदतीला घेतल्याखेरीज ईसवी शकाच्या आठव्या शतकापासून पुढच्या भारतीय इतिहास जुळवितां येत नाहीं, एवढें त्या बखरींचें महात्म्य आहे. भारतांच्या इस्लामी राजकर्त्यांपैकीं कित्येकांची आत्मचरित्रें व रोजनिशा उपलब्ध आहेत. सोळाव्या शतकामध्यें पोर्तुगीज व सातव्या शतकांत इंग्रज, फ्रेंच, डच, जर्मन यांनीं येथें व्यापाराकरितां आपल्या मालांची व कारभाराची कोठारें थाटलीं. त्यांच्या दप्तरांचा व भारतविषयक स्वतंत्र साहित्याचा मुसलमानी तवारिखांप्रमाणें मराठेशाहीच्या माहितीसाठीं उपयोग करावा लागतो. मग मराठेशाहीच्या योग्य ज्ञानाचा मार्ग सुगम होतो. मराठेशाहीचा समग्र इतिहास ग्रँट डफनें लिहिला नसता तर इतिहासाची जिज्ञासा महाराष्ट्रामध्यें उत्पन्न झाली असती कीं नाहीं, असा संशय मनाला छेडतो. १७८६ सालीं मॅलेट नांवाचा एक इंग्रज मुंबईच्या इंग्रज राज्यकर्त्यांच्या तर्फे वकील या नात्यानें पुण्यास आला व त्यानें तीन चार वर्षांच्या चिमुकल्या अवधींत मराठ्यांचा इतिहास लिहिण्याची तयारी केली. त्याच्या हातून तसा इतिहास लिहिला जावा, म्हणून कलकत्त्याच्या वरिष्ठांनीं त्याला परवानगी दिली. मॅलेटला जो

हेतु सिद्धीस नेतां आला नाहीं तो डफ साहेबानें पुरा केला. राजस्थान माळवा, पंजाब, बंगाल, म्हैसूर वगैरे प्रदेशांतील राजकीय इतिहास प्रथम इंग्रजांनीं लिहून काढले. भारताच्या प्राचीन इतिहासाची अशीच कथा आहे. अशोकाच्या शिलालेखांचें वाचन निरूपण करणारे पहिले इंग्रजच. नाहींतर ते शिलालेख भुताटकीच्या प्रकारांत गणले गेले असते. किंवा एका क्षेत्रांतील एका शिलालेखावर भाविकांनीं आपली पाठ घासून ८४ लक्ष योनींतून मुक्तता होण्याचा जो मार्ग स्वीकारला होता तो मार्ग त्या शिलालेखांच्या वाटणीस आला असता. चौऱ्यांयशीचा लेख या नांवावरून ८४ लक्ष योनींतून सुटण्याचा उपाय म्हणजे तो लेख, अशी कल्पना त्या लेखाबद्दल रूढ होऊन बसली. शास्त्र्यांनीं चौऱ्यांशी हा कालगणनेचा आंकडा आहे, असें ठरविलें तेव्हां त्या लेखाच्या रक्षणाचा योग आला. तोंवर त्या लेखांतील कांहीं भाग घासून निकालांत निघाला होता. अंधश्रद्धा आणि कोणत्याहि गोष्टीच्या वस्तुस्थितीची जिज्ञासा यांतील फरक दाखविण्यासाठीं या शिलालेखाचा निर्देश केला आहे. त्यांत अज्ञानानें लोकभ्रम कसे निर्माण होतात याचेंहि उत्तर सांपडेल. चौऱ्यांशी या संख्यावाचक शब्दामुळें एका शिलालेखावर जशी आपत्ति गुदरली तशीच 'शिरकाण' या शब्दाची ओढाताण होत असते. संभाजी महाराजांनीं शिर्के घराण्याची कत्तल उडविली, या समजुतीनें 'शिरकाण' हा कत्तलीचा पर्याय उदयास आणला व कत्तलीच्या ऐवजीं त्याचा उपयोग पुष्कळदां वाङ्मयांत केला जातो. शिरकाणच्या कत्तल या अर्थानुसार हबसाण म्हणजे हबशांची कत्तल, फिरंगाण म्हणजे फिरंग्यांची कत्तल असा ग्रह करून घेणें अवश्य आहे. परंतु हबसाण म्हणजे हबशीलोकांच्या वस्तीचा तसाच सत्तेचा प्रदेश, फिरंगाण म्हणजे पोर्तुगीजांच्या वस्तीचा आणि वर्चस्वाचा प्रदेश, हा अर्थ सर्वमान्य आहे. शिरकाण हा शब्द मुळांत शिर्क्यांच्या वस्तीचा वाचक आहे ऐतिहासिक कागदपत्रांतून शिर्क्यांच्या वस्तीचा भूभाग या अर्थानें तो वापरलेला दृष्टीस पडतो. मात्र हबसाण, फिरंगाण यांच्याइतका तो लोकांना परिचित नाहीं. संभाजी छत्रपतींनीं एकदोन शिर्क्यांना फंद-फितूरीसाठीं कदाचित् ठार केलें असेल, पण सर्व शिर्क्यांचा कत्तल हा निष्कर्ष काढण्याला अगदींच किरकोळ संख्येचा वधप्रसंग पुरेसा ठरत नाहीं.

ऐतिहासिक घटना संबंधांतील भ्रमांची कल्पना येथवर केलेल्या विवेचनानें होईल. मराठेशाहींतील बहुतेक कर्त्या पुरुषांविषयीं व प्रसंगाविषयीं भ्रम बळावलेले आहेत. अंधळ्या श्रद्धेनें गतकालीं भ्रम उत्पन्न केले. हल्लीं संशोधनपूर्वक इतिहास लिहिण्याचा आव आणणाऱ्या व्यक्तींनी बुद्धिपुरस्सर कांहीं भ्रमांना जन्म दिल्याचीं उदाहरणें आहेत. पानपतावर वीरोचित गतीचे भाग्य लाभलेले भाऊसाहेब पेशवे निष्कलंक चारित्र्याचे पुरुष होते, हा समज खरा असूनहि तो सपशेल चुकीचा, भाऊसाहेब हे बदफैली होते, असें सिद्ध करण्याचा यत्न अलीकडे एका इतिहासलेखकानें केलेला आहे. मराठेशाहीच्या नाशास राज्यलोभापायीं कारण झालेला रघुनाथराव दादासाहेब ऊर्फ राघोबा हा अतिशय शूर होता, हा समज वस्तुतः खरा नाहीं. परंतु हा समज रूढ आहे. त्याची लोकभ्रमांतच गणना होऊं शकते. नारायणराव पेशव्याचा खून झाला नाहीं तर त्यानें आत्महत्या केली असा वस्तुस्थितीच्या विपर्यासानें नवाभ्रम लोकांत पसरविण्याचा एका लेखकानें केलेला प्रचंड प्रयत्न चौदा-पंधरा वर्षांइतकाच जुना आहे. त्या प्रयत्नाविरुद्ध महाराष्ट्रांत बरीच खळबळ माजली होती, यामुळें तो प्रयत्न पुष्कळांच्या स्मरणांत असेल.

'लोकभ्रम' या विषयांवर प. वा. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं एक निबंध लिहून हा शब्द जनतेच्या परिचयांत आणून सोडला चिपळूणकरांनीं इंग्रजींत Superstition या शब्दानें ओळखल्या जाणाऱ्या व्यावहारिक व धार्मिक स्वरूपाच्या लोकभ्रमांची हजेरी घेतला होती. प्रस्तुत लेखांत इतिहासज्ञानांतील भ्रमांचा अत्यंत त्रोटक रीतीनें परामर्श केलेला आहे. ज्ञान मग तें कोणत्याहि विषयाचें असो, ते जितक्या प्रमाणांत निर्दोष असेल तितक्या प्रमाणांत तें पवित्र ठरतें. ज्ञानाची पवित्रता अबाधित रहाण्यासाठीं त्यावर कालगतीनें चढणारी भलभलत्या समजुतींची अर्थात् भ्रमांची धूळ झाडण्याचें कर्तव्य वारंवार त्या त्या विषयाच्या अभ्यासकांनीं बजावल्याशिवाय गत्यंतर नाहीं. • •



# लक्ष्मीसाठीं लक्ष्मीचा खून!

**२८** फेब्रुवारी १९५८ ची दुपार !

पुण्याच्या सी. आय. डी. ऑफीसमधील टेलीफोनची घंटा खणखणूं लागली.

तो टेलीफोन श्री. के. जी. नानावटी डी. आय. जी. यांचा होता. त्यांनी टेलीफोनवरून सी. आय. डी. ब्रँचचे सुपरिंटेंडेंट ऑफ पोलीस श्री. जी. एस्. चौबळ यांना आदेश दिला कीं कराडचे डॉ. जी. एन्. दातार यांनी तक्रार नोंदवली आहे कीं शुक्रवार पेठ पुणें येथें राहाणारी आपली आतेबहीण श्रीमती लक्ष्मीबाई अनंत कर्वे ही एकाएकीं कुठें नाहींशी झाली आहे; या अर्जाप्रमाणें तपास करण्याचें काम श्री. डी. बी. धांडे डेप्युटि सुपरिंटेंडेंट ऑफ पोलीस यांच्याकडे सोंपवा.

अशा तऱ्हेनें १ मार्च १९५८ रोजीं माझ्या हातीं डॉ. दातार यांचा तक्रार अर्ज आणि त्याविषयीच्या तपासाविषयींचा वरिष्ठ अधिकाऱ्याचा हुकूम मिळाला. डॉ. दातार यांनीं हा अर्ज ता. १६ जानेवारी १९५८ रोजीं मुंबईसरकारच्या मुख्य मंत्र्यांच्या नांवें केला होता. त्या अर्जाचा मतितार्थ असा कीं अनंत रामचंद्र कर्वे यांची विधवा पत्नी श्रीमती लक्ष्मीबाई ही ९ नोव्हेंबर १९५६ रोजीं पुण्याचे डॉ. अ. चिं. लागू यांच्यासह मुंबईस डॉ. आर. व्ही. साठें यांना प्रकृति दाखविण्यांसाठीं गेलीं. चार-पांच दिवसांनीं डॉ. लागू मुंबईहून एकटेच परत आले. लक्ष्मीबाईच्या एक भाडेकरू श्रीमती गोदूताई सप्रे यांनीं डॉ. लागूकडे लक्ष्मीबाईंची चौकशी केली असतां डॉ. लागूनीं सांगितलं कीं प्रकृतीच्या कारणासाठीं लक्ष्मीबाई आणखी कांहीं दिवस मुंबईत राहणार आहेत. कांहीं दिवसांनीं गोदूताईंनीं पुनरपि डॉ. लागूंना याबाबत विचारलें असतां ते म्हणाले कीं लक्ष्मीबाईचा त्यानंतर यात्रेसाठीं उत्तर हिंदुस्तानांत जाण्याचा विचार असल्यामुळें त्यांना तिचा पत्ता ठाऊक नाहीं. डॉ. दातारानीं आपल्या या अर्जांत पुढें असें म्हटलें होतें कीं लक्ष्मीबाई नाहींशी झाल्यापासून गेल्या चौदा महिन्यांत ठिकठिकाणाहून लक्ष्मीबाईंची म्हणून त्यांना तीन-चार पत्रें आलीं. अनेक इलेक्ट्रिक कंपन्यांत लक्ष्मीबाईच्या नांवावर अनेक शेअर्स असून शिवाय पुण्यांतील कांहीं बँकांत तिच्या नांवे फार मोठी रक्कम जमा असल्यामुळे आणि डॉ. लागूच कायते हें गूढ उकलण्यास समर्थ असल्यामुळे लक्ष्मीबाईच्या एकूण अस्तित्वाबाबतच शंका येण्यास भरपूर वाव आहे.

या अर्जाप्रमाणें माझ्याकडे या गुन्ह्याच्या तपासाचें काम देण्यांत आलें. या प्रकरणाचा छडा लावणं हें जरा अवघडच काम होतं. पहिली गोष्ट अशी कीं लक्ष्मीबाई नाहींशी होऊन १६ महिने लोटले होते. आणि दुसरी गोष्ट अशी कीं या प्रकरणांत मला माहिती देऊं शकेल असा एकच माणूस आणि तो म्हणजे डॉ. लागू. मी तपासाची दिशा निश्चित केली. विश्रामबाग पोलिस स्टेशनवरून प्रकरणाचे सर्व कागदपत्र ताब्यांत घेतले. त्यांत सर्व तक्रार अर्ज, लागूंच्या जबान्या लक्ष्मीबाईनीं म्हणून लिहिलीं गेलेलीं पत्रें आणि डॉ. लागूंची दोन पत्रें; हे सर्व कागदपत्र चाळतां चाळतां एक गोष्ट माझ्या सहज ध्यानीं आली कीं डॉ. लागूंच्या दोन पत्रांतील हस्ताक्षर आणि लक्ष्मीबाईनीं आपल्या नातेवाईकांना





अनुक्रमणिका

**डॉ. लागू-खटला हा पुण्याच्या इतिहासांतील एक अभूतपूर्व खटला. महाराष्ट्रांत या खटल्याएवढी प्रचंड खळबळ दुसऱ्या कोणत्याहि खटल्यानें उडवली नाहीं. एका तरुण आणि श्रीमंत ब्राह्मण विधवेचा एका नांवलौकिकवान डॉक्टरनें पैशापायीं केलेला अमानुष खून ही घटनाच मोठी भयानक होती. या प्रकरणाचा पहिल्यापासून छडा लावून डॉ. लागूंचें हें कृष्णकृत्य जगासमोर आणणारे एक कर्तबगार पोलीस अधिकारी श्री. डी. वी. धांडे डेप्युटी सुपरिन्टेंडेंट ऑफ पोलिस सी. आय. डी. (क्राईम) यांनींच आपण हा तपास कसा लावला याची रोमहर्षक कहाणी निवेदन केली आहे.—**

पाठविलेलीं पत्रें यांच्या हस्ताक्षरांत असणारें विलक्षण साम्य. लक्ष्मीबाईच्या एकाएकीं नाहींशा होण्याच्या घटनेंत कुठेंतरी विसंगति आहे असेंहि माझ्या ध्यानीं आलें. आणखी एक पुरावा सांपडला. साऊथ मद्रास इलेक्ट्रीकल कॉर्पोरेशन, मद्रासकडून ४ मार्च १९५८ ला आलेले एक पत्र. या पत्रांत असें लिहिलें होतें कीं ५०० रु. किंमतीचे. दोन चेक आणि त्यावरील ११ रु. चें व्याज कंपनीने लक्ष्मीबाईना २० वी. शुक्रवार पेठ पुणें (हा डॉ. लागूंच्या दवाखान्याचा पत्ता) या पत्त्यावर ९ सप्टेंबर १९५७ ला पाठवले. मी इन्स्पेक्टर केदारींना पुणें सिटीपोस्टांत गुप्त चौकशी करायला पाठवलें. त्या रजिस्टर पत्राची रसिट केदारींनीं शोधली आणि आश्चर्य असें कीं ९ सप्टेंबर १९५७ ला या रिसिटवर लक्ष्मीबाई ए. कर्वे अशी इंग्रजींत सही केली होती. या प्रकरणांत लागूच जबाबदार आहे अशी माझी खात्री झाली असली तरी एवढ्याच्च पुराव्यावर पुढें जाणें कठिण होतें.

मी रामचंद्र कर्वेला बोलावलं आणि त्याची तक्रार नव्यानें नोंदवली. आपल्या आईच्या आकस्मिक नाहींशा होण्याला डॉ. लागू कारणीभूत असून शिवाय त्यानें घरांतील चीजवस्तु पळवल्या असा रामचन्द्रानें आरोप केला. दूर गांवाहून आलेलीं आपल्या आईच्या सहीचीं पत्रेंहि त्यानें आमच्या स्वाधीन केली. याशिवाय त्यानें आमच्याकडे तक्रार नोंदविण्याच्या आदल्या दिवशीं त्याला आलेलं एक पत्र त्यानें आमच्या स्वाधीन केलं. हें पत्र म्हणजे सरकारी स्टॅंपवर पाठविलेलें वेचनपत्र. या वेचनपत्रान्वयें रामचन्द्राला वासूनाना जोशी यांच्यासाठीं ठेवलेले ३५००० रु. मिळायचे होते. याशिवाय बृहन्महाराष्ट्र शुगरसिंडीकेटचीं शेअर सर्टिफिकिटें व डेक्कन इंडस्ट्रियल बँकेंतील मिक्सड डिपॉझिट (२००० रु.) ची रिसिट. या पत्राबरोबर त्यानें त्याचें पोस्टाचें पाकीटहि आणलें होतें. हें पाकीट मी काळजीपूर्वक तपासलें आणि माझ्या लक्षांत आलें कीं यावरचे पोस्टाचे शिक्के हे पुण्याच्या पोस्ट-ऑफीसचे आहेत. याचा अर्थच असा कीं हे कागदपत्र पुण्यांतच पोस्टांत टाकले गेले. या कागदपत्रासमवेत लक्ष्मीबाईच्या सहीचें राठोडीहून लिहिलेलें एक पत्र. साहजिकच हे कागदपत्र रामचन्द्रानें खूष होऊन या प्रकरणीं कांहीं गडबड करूं नये म्हणून पाठविण्यांत आले होते. असामान्य प्रतिभेच्या कादंबरीकारालाहि आपल्या कथासूत्रांत सुसंगति ठेवणें कठिण जातें. डॉक्टरनें रचलेल्या या कटांतील कच्चे दुवे चाणाक्ष डिटेक्टिवाच्या ध्यानीं येण्यास कितीसा वेळ लागणार ? ही डॉक्टरनें तयार केलेलीं पत्रें म्हणजे त्यानें तयार केलेलीं आणि अंतिम त्याला प्राणघातक ठरलेलीं शस्त्रेंच. शिवाय राठोडी नांवाचें गांवहि या भूतलावर अस्तित्वांत नव्हतें.

### झडप घातली

११ मार्चला रामचंद्र कर्वेची तक्रार रजिस्टर केली आणि पळाचाहि विलंब न लावतां इन्स्पेक्टर पवार, इन्स्पेक्टर केदारी, नलावडे आणि कांहीं पोलीस घेऊन मी हिराबागेंत डॉ. लागूंच्या घरीं गेलों. 'शारदा सदन' हें त्या घराचें नांव. आम्ही स्टेशनवॅगन बाजूला उभी केली आणि डॉक्टरांच्या घराचा दरवाजा ठोठावला—

डॉक्टरांची पत्नी सौ. विजया लागू हिनें पाहुण्यांच्या स्वागतार्थ दरवाजा उघडला आणि दरवाजांत पोलीस अधिकारी पाहून ती दचकलीच. मी शांतपणें आमच्या येण्याचें कारण सांगितलं आणि डॉ. लागूंची चौकशी केली. डॉक्टर अद्याप घरी आले नव्हते म्हणून ते येईपर्यंत आम्हांला थांबावं लागलं. लक्ष्मीबाईची घरफोडी आणि चोरी केली यासाठीं आम्ही तुमची झडती घ्यायला आलो आहोंत असें सांगतांच डॉ. लागूंनांहि धक्का बसला. रामचंद्र कर्वे हा अविश्वासू माणूस असून त्याच्या तक्रारीवर विश्वास ठेवून माझ्यासारख्या इभ्रतदार माणसाला आपण उगाच छळत आहांत असं त्यांनीं आम्हाला पटवून देण्याचा प्रयत्न केला. या चर्चेचा कांहीं उपयोग नाहीं हें मी डॉक्टरना पटवून दिलं आणि त्यांच्या घराची झडती घ्यायला प्रारंभ केला. ही झडती घेणं म्हणजे सोपं काम नव्हतं. ती संपवायला आम्हाला पांच तास लागले. पण हे आमचे परिश्रम फुकट नाहीं गेले. मुंबईहून पाठविलीं गेलेलीं आणि लक्ष्मीबाईच्या सहीची दोन पत्रें, एक चोरलेले भिंतीवरचें घड्याळ मिळाले. या वस्तु जेव्हां आम्हाला मिळाल्या, तेव्हां डॉ. लागूंना दरदरून घाम सुटला होता.

घराची झडती आटपून आम्ही फुलेमार्केटमधील त्यांच्या दवाखान्याची झडती घेतली. या झडतींत कांहीं महत्त्वाचे कागदपत्र, चोरलेला वजनाचा काटा, एक सुती चादर आणि लक्ष्मी कर्वे यांची डॉ. लागूंच्या टेबलावरची मेडिकल केस. या मेडिकल केसमधील एक गंमतीची नोंद म्हणजे डॉ. लागूंनीं ३० फेब्रुवारी १९५८ ला श्रीमती कर्वे यांना तपासलें होते. (३० फेब्रुवारी १९५८ ही तारीखच अस्तित्वांत नाहीं !)

### डॉक्टरना अटक

डॉ. लागूंच्या घराची आणि दवाखान्याची झडती आटोपल्यावर १२ मार्च १९५८ रोजीं दुपारीं १ वाजता आम्ही डॉ. लागूंना अटक केली. अटक केल्यानंतर इन्स्पेक्टर पवार, इन्स्पेक्टर केदारी, नलावडे आणि मी त्यांना अनेक प्रश्न विचारले. लक्ष्मीबाई मुंबईस औषधोपचारासाठीं गेली आणि त्यानंतर ती यात्रेला गेली. यापलीकडे



## कविता घ्या हो कविता

कविता घ्या हो कविता घ्या
रचुनि आणल्या छापा या ॥ ध्रु० ॥

छोट्या कविता, मोठ्या कविता,
सोप्या कविता, कठीण कविता,
पद्यीतिल व गद्यहि अथवा,
हव्या तशा या घेउनि टेवा ॥ १ ॥

घाउक या रचलेल्या कविता,
किरकोळ करा प्रसिद्ध आतां
तंत्रांत जुन्या वा नवकाव्या,
मा॰णि लौकर इथें नोंदवा ॥ २ ॥

प्रचंड सांठा हा काव्याचा,
पुरवठा करूं अखंड स चा
मोबदल्याची नसे अपेक्षा,
मिळो प्रसिद्धी एकच वांछा ॥ ३ ॥

काव्याचे हे जंगी भारे,
मैत्रिणि आम्हीं आणित या रे
सार्थक करि कष्टांचे सारे,
स्वीकारुनि या प्रकाशकारे ॥ ४ ॥

कविता ध्या हो कविता घ्या,
मोल द्या न द्या--छापा या ।

—एकू

---

आपल्याला तिची कांहींच माहिती नाहीं असेहि त्यांनीं सांगितलें. लक्ष्मीबाईच्या बँक ऑफ महाराष्ट्र मधील खात्यावरून आपण कांहीं रक्कम उचलली आणि ती पुण्याला आली असतांना आपण तिला ती रक्कम देऊन टाकली असे त्यांनीं सांगितले. मात्र लक्ष्मीबाईचे अहमदाबाद इलेक्ट्रीक कंपनींचे शेअर्सपैकीं ९६ शेअर्स आपण आपल्या बायकोच्या आणि आपल्या नांवावर केले हें त्यांनीं कबूल केलें.

संध्याकाळीं आम्हीं डॉक्टर लागूंना पुण्याच्या मॅजिस्ट्रेट समोर हजर केलें आणि अधिक तपासासाठीं सात दिवसांचा रिमांड मागितला. पण आम्हाला चार दिवसांचा रिमांड मिळाला याचा अर्थ असा कीं अवघ्या चार दिवसाच्या अल्प मुदतींतच आम्हाला या सर्व रहस्याचा छडा लावायचा होता.

### लक्ष्मीबाई जिवंत आहे कीं मृत ?

या तपासांतील मुख्य सूत्र म्हणजे लक्ष्मीबाई जिवंत आहे कीं मृत आहे याचा शोध लावणें. कारण तिची सही असलेलीं लांबलांबच्या गांवांहून आलेलीं पत्रें यावरून वरवर असा ग्रह होणें साहजिकच होतें कीं, लक्ष्मीबाई जिवंत असून तीर्थयात्रा करीत हिंडते आहे. या या पत्रांची मी काळजीपूर्वक तपासणी केल्यावर मला स्पष्ट दिसून आलें कीं हीं पत्रें बनावट असून ती वेगवेगळ्या हस्ताक्षरांतील आहेत.

१३ मार्च १९५८ रोजीं आम्हांला एकानें बातमी दिली कीं कमल देशपांडे नांवाच्या एका तरुण विधवेकडून या प्रकरणाबाबत माहिती मिळण्याचा बराच संभव आहे. कमल देशपांडे ही डॉ. लागूची पेशंट, त्यामुळें तिच्याकडून लक्ष्मीबाईबाबत बरीचशी माहिती मिळण्याची शक्यता होती. कमल देशपांडेचा आम्ही पत्ता लावला. या बाईची प्रकृति मूळांत तोळामासा असल्यामुळें तिच्यापासून माहिती काढतां येणं जरा कठिण काम होतं. आम्ही तिच्या एका नातलगाची मदत घेतली आणि शेवटीं तिनें कबूल केलं कीं १९५७ च्या एप्रिल महिन्यांत आपल्या आजारी वडिलांना इंजेक्शन देण्यासाठीं डॉ. लागू आपल्या घरीं आले होते. त्यावेळीं आपले एखादें काम करशील कां असें त्यांनीं तिला विचारलें. कसलें काम असें विचारतां डॉक्टरनीं सांगितलें कीं कांहीं पत्रें लिहायचीं आहेत. तिनें याला कबूली दिली. एकूण तिनें तीन पत्रें डॉक्टरांना लिहून दिलीं. पहिलें पत्र ता. १२ एप्रिल १९५७ चें वासूनाना जोशी पुणें यांना लिहिलेले. पत्राचा पत्ता पुरी C/o रामशरण पांडे दुसरें पत्र पुरीच्याच पत्त्याचें दादा ऊर्फ डॉ. दातार यांना लिहिलेलें आणि तिसरें ९ मे १९५७ चें नाशिकहून वासूनाना जोशी यांच्या नांवें लिहिलेलें. हीं पत्रें माझ्या ताब्यांत होतींच. तीं मी तिला दाखवली. तिनें कबूल केलें कीं पत्राचें हस्ताक्षर तिचेंच आहे. पण लक्ष्मीबाई कर्वे ही सही मात्र आपण केलेली नाहीं असें तिनें सांगितलें.

कमलच्या या जबानीमुळें आमचे हात अधिकच बळकट झाले. आमच्या हातांत असलेल्या कागदपत्राच्या जोरावर डॉ. लागूंना लक्ष्मीबाईचा थांगपत्ता लपविणें अशक्यच होतें. लागूंच्या अटकेची बातमी पुण्याच्या वर्तमानपत्रांत जाड मथळे देऊन छापली गेली होती हीं वर्तमानपत्रें जेव्हां त्यांच्या हातीं पडली तेव्हां ते ओक्साबोक्शी रडूं लागले. मी त्यांचे सांत्वन केलें आणि आतां तरी खरी माहिती सांगा अशी विनंति केली.

शेवटीं हरप्रयत्नानें डॉ. लागू खरी माहिती द्यायला कबूल झाले. त्यांनीं कबूल केलं कीं १३ नोव्हेंबर १९५६ रोजीं दुपारीं ३ वाजतां आपण डॉ. आर. व्ही. साठे यांची लक्ष्मीबाईची प्रकृति तपासून घेण्यासाठीं अपाईंटमेंट घेतली होती. व त्याकरितां १३ नोव्हेंबरला आपण लक्ष्मीबाईच्या घरीं रात्रौं ९ वाजतां गेलों. तेथून दोघेजण रिक्शांत बसून पुणें स्टेशनवर गेलों. पुणें स्टेशनवर १० वाजतां पुण्याहून सुटणाऱ्या पॅसेंजर गाडींत आपण बसलों आणि १२ वाजतां झोंपी गेलों; पहांटे भायखळा स्टेशनवर गाडी आली आणि आपण लक्ष्मीबाईंना उठवायला गेलों आणि पाहातो तो लक्ष्मीबाई बेशुद्धावस्थेंत. बोरीबंदर स्टेशनवर जेव्हां गाडी आली तेव्हां स्ट्रेचर

मागवून आपण तिला टॅक्सीतून गोकुळदास तेजपाल हॉस्पीटलमध्यें सकाळीं ५॥ वाजतां नेलें. त्याठिकाणीं एका तरुण स्त्री डॉक्टरनें लक्ष्मीबाईंवर औषधोपचार केला. आपण शेवटपर्यंत लक्ष्मीबाईच्या शेजारीं होतों आणि सकाळी ११-२५ ला लक्ष्मीबाई मरण पावली. आपण तसेंच पुण्याला आलों आणि लक्ष्मीबाईच्या मृत्यूची बातमी कुणालाच कळवली नाहीं.

आतां डॉक्टरनें सांगितलेल्या हकीकतीचा खरेखोटेपणा तपासून पाहाण्यास लागलीच मुंबईस जाणें आवश्यक होतें. गेले तीन दिवस आम्हाला अक्षरशः झोंप मिळाली नव्हती अगर विश्रांतिही नव्हती. तरीपण वेळ गमावता कामा नये म्हणून आम्ही मुंबईला जायचें ठरविलें.

१४ मार्च १९५८ ला सकाळीं आम्ही डेक्कन क्वीननें डॉ. लागूंच्या बरोबर मुंबईस निघालो. लागू आमचे कैदी आहेत असा जरासुद्धां संशय इतर उतारूंना येऊं नये यासाठीं आम्हीं त्यांना हातकड्या घातल्या नव्हत्या किंवा युनिफॉर्म घातलेला एकहि पोलीस जवळपास ठेवला नव्हता. डॉ. लागूंनीं आम्हाला तडक जी. टी. हॉस्पीटलमध्यें आर. एम. ओ. च्या खोलींत नेलें. त्याठिकाणीं डॉ. माऊस्कर हे रोजच्या कागदपत्रांवर सही करण्यांत गुंतले होते. त्यांनीं डॉक्टर लागूंना अभिवादन केलें आणि आगमनाचा हेतु विचारला. डॉ. माऊसकरांना आम्ही कोण आहोंत हें समजावून दिलें आणि डॉ. लागू हे आमचे कैदी आहे हें त्यांच्या कानीं घातलें. आम्हीं लक्ष्मीबाई कर्वे यांचा मेडिकल रेकार्ड तपासलें. त्या रेकार्डमध्यें असें नमूद केलें होतें कीं इंदुमती पोंक्षे याना डायोबेटिक कोमानें मृत्यु आला. प्रेताची उत्तरीय तपासणी व्हावी ही शिफारस खोडून त्या ठिकाणीं डायोबेटिक कोमानें मृत्यु असा शेरा डॉ. मिस् अनिजा यांनीं दिला होता.

डॉ. माऊसकरांशीं आम्ही इंदुमतीचें पुढें काय झालें याची विचारणा केली. त्यानीं सांगितलें कीं त्यानीं डॉ. लागूंना पुण्यास तार पाठविली कीं प्रेत हलवा. या तारेला डॉ. लागूनीं पत्रद्वारें उत्तर पाठविलें आणि त्यांत कळवलें कीं इंदुमती पोंक्षे हिचा कलकत्याचा देशपांडे नांवाचा भाऊ तेथें येईल आणि प्रेताचा ताबा घेईल. या पत्राप्रमाणें कोणीच प्रेताचा ताबा घ्यायला येत नाहीं असें पाहून त्यांनीं एस्प्लेनेड पोलीस स्टेशनला कळविलें कीं या प्रेताचा ताबा घेऊन त्याची योग्य ती विल्हेवाट लावा. एस्प्लेनेड पोलीस स्टेशननें मयताच्या मृत्यूचें कारण विचारलें. या डॉ. अनिजाच्या शिफारसीच्या आधारानें डॉ. माऊसकरांनीं 'डेथपास' पाठवून दिला आणि त्यांत मृत्यूचें कारण 'डायोबेटिक कोमा' असें दाखविलें. याशिवाय एस्प्लेनेड पोलिस स्टेशननें विश्रामबाग पोलीस स्टेशनला वायरलेसनें कळविलें कीं इंदुमती पोंक्षे वारल्याचें डॉ. लागूंना कळवा. त्याप्रमाणें विश्रामबाग पोलीस स्टेशननें डॉ. लागूंना बोलावून घेतलें. त्याठिकाणीं डॉ. लागूंनीं स्पष्ट सांगितलें कीं आपली आणि इंदुमतीची कांहींच ओळख नाहीं, त्या आपल्याला गाडींत भेटल्या. भायखळा स्टेशनवर त्या बेशुद्ध अवस्थेत आढळल्या म्हणून आपण डॉक्टरचें कर्तव्य म्हणून एका हॉस्पीटलमध्यें पोंचविलें.

इकडे एस्प्लनेड पोलिस स्टेशननें प्रेताचा ताबा घ्यायला कोणीच पुढें येत नाहीं असें पाहून कॉरोनरला प्रेताची विल्हेवाट लावण्याबाबत १९ नोव्हेंबर १९५६ रोजीं कळविलें. त्याप्रमाणें इंदुमतीचें प्रेत जे. जे. हॉस्पीटलच्या 'मॉर्ग' मध्यें ठेवण्यांत आलें. मात्र त्यापूर्वी एस्प्लेनेड पोलिसांनीं प्रेताचें छायाचित्र घेऊन ठेवलें. बॉम्बे सी. आय. डी. चे फोटोग्राफर श्री. जाधव यांनी फार मेहनत घेऊन फोटोची निगेटिव्ह शोधून काढली. त्या फोटोचा प्रिंट काढला तेव्हां आम्हाला कळून चुकलें कीं, इंदुमती पोंक्षे ही दुसरी तिसरी कोणी नसून लक्ष्मीबाई कर्वे आहे.

या वेळेस आणखी एक घटना घडली. जे. जे. हॉस्पीटलच्या अॅनॅटोमीचे प्रोफेसर डॉ. सेठना यांना विद्यार्थ्यांच्या पुढें चिरफाड करायला कांहीं प्रेतें हवीं होती व त्याप्रमाणें त्यांनीं कॉरोनरकडे तशी मागणी केली. कॉरोनरनें जीं प्रेतें पाठवली त्यांत लक्ष्मीबाई कर्वे हिचेंहि प्रेत होतें. कॉरोनरच्या परवानगीनें जे. जे. तील एक कामगार भगवान दगडू चार प्रेतांना ताबा घेण्यासाठीं मॉर्गमध्यें गेला. प्रेताचा ताबा घेतांना त्याला असें आढळलें कीं, लक्ष्मीबाईच्या मानेवर कसली तरी खूण आहे. भगवान दगडूनें प्रेतांची ने-आण करण्यांत जन्म घालवलेला; त्यामुळें लक्ष्मीबाईचें सशक्त आणि सुंदर शरीर आणि त्यांच्या मानेमागची खूण पाहून त्याला आश्चर्य वाटलें. आणि थोडा संशयहि आला. त्यानें ही गोष्ट डॉ. सेठनांच्या कानीं घातली. डॉ. सेठनांनीं स्वतः मॉर्गमध्यें येऊन प्रेताची तपासणी केली आणि त्यांनाहि असाच संशय आला. त्यांनीं आपला संशय कॉरोनरला कळवला. कॉरोनरनें व भायखळा पोलिसांनीं प्रेताचा पंचनामा करण्याचा हुकूम दिला.

हा पंचनामा हातीं दिल्यावर कॉरोनरनें, पोलीस सर्जननें प्रेताचें पोस्ट मॉर्टम करावें असा आदेश दिला. याप्रमाणें पोलीस सर्जन डॉ. झाला २३ नोव्हेंबर १९५६ रोजीं म्हणजे लक्ष्मीबाईच्या मृत्यूनंतर १० दिवसांनीं 'पोस्टमॉर्टम' केलें. या तपासणींत विषाचा कोणताच अंश न आढळल्यानें डॉ. झाला यांनीं 'डायबेटिक कोमा' हेंच मृत्यूचे कारण असें मत दिलें. या मताला अनुसरून कॉरोनरनें १६ जानेवारीला चौकशी करून डायबेटिक कोमामुळें लक्ष्मीबाईस मृत्यू आला असा निकाल देऊन त्यानंतर हिंदु रिलीफ कमिटीकडे प्रेत अंत्य संस्कारा साठीं पाठविण्यांत आलें.

जी. टी. हॉस्पिटलमधील रेकॉर्ड अशा तऱ्हेनें आमच्या बाजूचा नव्हता. इंदुमतीला डायबेटिक कोमानें मृत्यू आला नाहीं हें कसें सिद्ध करायचें ? या बाबतींत डी. आय. जी. नीं मला असा सल्ला



दिला कीं मी ख्यातनाम पोलीस सर्जन डॉ. एच. एस. मेहता यांचा सल्ला घ्यावा. डॉ. मेहता यांनी गेलीं वीस वर्षे पोलिस सर्जन म्हणून काम केलें होते आणि त्यांनीं ख्याति विशेष होती. २२ एप्रिलला डॉ. मेहेतांनीं असें मत दिलें कीं लक्ष्मीबाई कर्वे डायबेटिक कोमानें निश्चित वारल्या नाहींत. त्यांच्या मृत्यूचें कारण एखादें अज्ञात विष असावें. आणि ज्या कांहीं विषांची परीक्षा होणें कठीण असतें अशा एखाद्या विषानें त्यांना मृत्यू आला असावा असें मत त्यांनीं प्रकट केलें. शिवाय लक्ष्मीबाईचें प्रेत 'मॉर्ग' मध्यें मृत्यूनंतर बराच काल राहिल्यामुळें अशा विषाचा मागमूसहि सांपडणें कठीण होतें. डॉ. मेहतांचें मत मलाहि पटलें.

### पैशाला लालचावलेला डॉक्टर

जी. टी. हॉस्पिटल मधील या प्रकरणाचा छडा लावल्यावर आम्ही डॉ. लागूंच्या इतर हालचालीची तपासणी सुरू केली. पैशापायीं या गृहस्थानें लक्ष्मीबाईचें घर फोडून आंतील चीजवस्तु लांबवण्यापर्यंत मजल नेली. बाईच्या मृत्यूनंतर दोन दिवसांनीच त्यानें बाईच्या खात्यांतील बँक ऑफ महाराष्ट्रमधून ५००० ची उचल केली. यासाठीं लक्ष्मीबाईच्या सहीची चिठी बँक ऑफ महाराष्ट्राला पाठवली. हे पैसे त्यानें खोटा चेक तयार करून वटवले. आणि असाच दुसरा चेक तयार करून १२ मार्च १९५७ ला ३६४० रु. काढले. इतकंच काय पण बँकेंतील उरलेले शेवटचे ११६ रु. काढून बँकेंतील खातें बंद करण्याचा त्यानें प्रयत्न केला. पण बँक ऑफ महाराष्ट्रमधील सब अकाऊंटंटला संशय येऊन त्यानें लक्ष्मीबाईनाच खातें बंद करतांना खुद्द घेऊन या असें सांगितलें. अर्थात् लागूनें पोबारा केला आणि त्यांनीं परत तोंड दाखवलें नाहीं.

हा सर्व पुरावा गोळा करण्यांत आला. याशिवाय साऊथ मद्रास इलेक्ट्रिक सप्लाय कॉर्पोरेशनकडून आलेले ५११ रुपये त्यांनीं वटवून बँकेंत आपल्या नांवावर भरले. डॉ. लागूनीं लक्ष्मीबाईच्या शेअर्सचीहि अफरातफर केली असा आमचा तर्क होताच. त्यामुळें मुंबईच्या मुक्कामांत मुंबईच्या एस. आर. केतकर अँन्ड सन्स या शेअर ब्रोकर्सची गांठ घेतली. निरनिराळ्या कंपन्यांचे मिळून एकूण १७००० रु. चे शेअर्स लक्ष्मीबाईच्या नांवचे होते. ते डॉ. लागूनीं खोट्या सह्या करून आपल्या आणि आपल्या बायकोच्या नांवें बदलून मुंबईच्या शेअर मार्केटमध्यें मे. केतकर अँन्ड सन्स यांच्या करवीं विकले. या सगळ्या खोट्या सह्या त्यानें पुण्यांतील ऑनररी सेकन्डक्लास मॅजिस्ट्रेटसमोर अँटेस्ट करून घेतल्या. याशिवाय वासूनाना जोशी यांच्याकडे असलेल्या ३५००० रु. पैकीं कांहीं रक्कम मिळविण्यासाठीं एक खोटें वेचनपत्र तयार करून तें त्यानें पोस्टानें वासुनानांकडे पाठविलें. पण तेवढ्या आधारावर वासूनानांनीं पैसे देण्याचें नाकारलें. स्थानिक वृत्तपत्रांनीं या सर्व बातम्यांना ठळक प्रसिद्धि दिल्यामुळें चोरीचा माल ज्यांच्या ज्यांच्याकडे होता त्यांनी तो पोलिसांच्या हवालीं केला. अशा तऱ्हेनें रेडियो, रेशमी शाल आणि लांकडी कपाट पोलीसांच्या हातीं आलें.

### खोटीं पत्रें लिहिणारा डॉक्टर

खोटीं पत्रें कोणी लिहिलीं याचीहि डॉ. लागूंकडून माहिती काढण्यांत आली. कमल देशपांडेच्या पत्रांखेरीज इतर कांहीं पत्रें आणि वेचनपत्र आपण लिहिल्याचें डॉ. लागूनें कबूल केलें. अशीं एकूण २६ पत्रें त्यानें लिहिली. हीं पत्रें गोळा केल्यानंतर आणि तीं नीट वाचल्यानंतर असें दिसलें कीं लक्ष्मीबाई जिवंत असून तीर्थयात्रा करीत गांवोगांव हिंडत आहे असा भास निर्माण करण्याचा एक पद्धतशीर प्रयत्न डॉ. लागूनें केला. लक्ष्मीबाईच्या मृत्यूनंतरच्या आठ महिन्यांत आरोपीनें असा हा प्रयत्न मोठ्या पद्धतशीरपणें केला आणि त्या काळांत तिच्या बिऱ्हाडांतील वस्तुन् वस्तु लांबविली.

हीं खोटीं पत्रें पाठविण्यासाठीं डॉ. लागूनें एक अभिनव युक्ति योजिली. तो एका बंद पाकीटांत सात आठ बंद पाकिटें ठेवी. या बंद पाकीटांवर कराड नाशिक वगैरे पत्ते असत. आणि हीं सातआठ पत्रें तो मोठ्या पाकीटांत घालून तें मोठें पाकीट ठराविक ठिकाणच्या पोस्ट मास्तरच्या नांवे पाठवीत असे. साहाजिकच तो पोस्टमास्तर आपलें पत्र उघडून पाही तर आंत चारपांच निरनिराळीं पत्ते असलेली पाकीटें तो साहाजिक पोष्टांत टाकी. अर्थात् त्यामुळें या पाकीटावर तेथील पोस्टाचा स्टँप असे.

### अभूतपूर्व खटला

११ मार्च १९५८ ला या तपासाचें काम सुरू झालें आणि ८ मे १९५८ ला समाप्त झालें. इंडीयन पीनल कोड ३०२ अन्वयें आणि इतर अनेक कलमान्वयें डॉ. लागूवर ज्यूडिशियल मॅजिस्ट्रेट फर्स्ट क्लास यांच्या कोर्टांत आरोप ठेवण्यात आला. ११ ऑगस्ट १९५८ ला सुरू झालेला हा खटला सहा आठवडे चालला आणि पांच वकीलांनी मोठ्या हिरीरीनें लढवला. असिस्टंट पब्लिक प्रॉसिक्यूटर श्री. पी. के. गुप्ते यांनी सिनीअर पोलीस प्रॉसिक्यूटर श्री. जी. एल. आपटे यांच्या मदतीनें सरकारतर्फे काम चालविलें. ८३ साक्षीदार तपासण्यांत आले. त्यांत १३ डॉक्टर १ ऑनररी मॅजिस्ट्रेट व एक मुकी व बहिरी मुलगी, एक शेअर ब्रोकर, एक वकील, बँकेचा अधिकारी वर्ग, आणि कित्येक पोलीस अधिकारी होते. पुण्याच्या सेशन्स कोर्टाच्या इतिहासांतील अत्यंत खळबळजनक खटला. त्या काळांत पुण्यांत आणि महाराष्ट्रांत सर्वांच्या तोंडी याशिवाय दुसरी गोष्ट नव्हती.

२७ ऑक्टोबरला खटल्याचा निकाल लागला. त्यादिवशीं कोर्टांत टांचणी पडली तरी आवाज येईल अशी शांतता होती. ११॥ वाजतां सेशन्स जज्ज श्री. व्ही. ए. नाईक स्थानापन्न झाले. घरफोडी वगैरे गुन्हे आरोपीनें कबूल केले होतेच. या गुन्ह्यासाठीं जन्मठेप आणि इतर शिक्षा सुनावल्या. न्यायाधिशानीं निकाल वाचायला पांच तास घेतले अणि बरोबर पांच वाजतां डॉ. लागूना देहांत शासनाची शिक्षा जाहीर केली.

न्यायाधीशांनीं आपल्या निकालपत्रांत पोलिसांच्या तपासणीच्या कामांतील हुशारीची प्रशंसा केली होती.

२० जानेवारी १९५९ रोजीं डॉ. लागूची ही शिक्षा मुंबई हायकोर्टानें कायम केली आणि लागूचे अपील फेटाळलें. याशिवाय हायकोर्टानें २२ जानेवारीला सुप्रीम कोर्टकडे अपील करण्याची परवानगी नाकारली.

—आणि या अंगावर शहारे आणणाऱ्या खून-खटल्याची समाप्ति झाली.

[ पोलीस कार्टलीवरून ]

अनुक्रमणिका

*'तिच्या' नाखुषीचें कारण शोधण्यांत आणि 'तिला' खूष ठेवण्यांत आम्हीं सामान्यांत गणलेले लोक आयुष्यभर थकून जातों., परंतु...*



# जिथं नेपोलियन हरला!

वसंत सबनीस

नेपोलियनच्या शब्द-कोषांत अशक्य हा शब्द नव्हता असे म्हणतात आणि तोहि स्वतः तसेंच म्हणत असे म्हणे. पण ही एक ऐतिहासिक थाप आहे अशी माझी खात्री आहे. किंवा त्याचा शब्दकोष फक्त रणांगणापुरताच मर्यादित असावा. कारण बायकोला खूष ठेवण्याच्या बाबतींत नेपोलियनजवळ अशक्य या शब्दाशिवाय दुसरा शब्दच नव्हता.

नेपोलियची महत्वाकांक्षा बाहेरचे सगळे जग जिंकायची होती म्हणून तो इतके तरी नांव कमावू शकला. त्यानें बायकोचें मन जिंकायची महत्वाकांक्षा धरली असती तर जन्मभर तो पराभूतच होत राहिला असता. इतकंच नव्हे तर मी नक्की सांगतो कीं जग जिंकायचं कां बायकोला खूष करून तिचं मन जिंकायचं असा जेव्हां नेपोलियन-पुढें प्रश्न पडला, तेव्हां त्यानें जग जिंका-यची इच्छा धरली ती केवळ दुसरी गोष्ट असाध्य आहे त्याची याला खात्री पटली म्हणूनच ! जग जिंकण्यामागील त्याचा जाहीर हेतु कांहींही असो; पण एक गोष्ट मात्र निश्चित् त्यानं बायकोला खूप करण्या-साठीं केव्हांतरी गाफीलपणें आश्वासन दिलं असेल, कीं, पहा तर खरं, सबंध जग जिंकून तुझ्या पायावर घालतो आणि तुला खूप करतों ! हा प्रसंग कदाचित इतिहासाला माहीत नसेल.

त्यानें परराष्ट्रांना जेवढे खलिते लिहिले नसतील तेवढी पत्रें त्यानें रणांगणावरून बायकोला लिहिलीं. तीं राष्ट्रें नमलीं पण बायको नमली नाहीं ! लढाया मारून त्याची तरवार अधिक बोथट झाली कीं रणांगणावर बायकोला पत्रें लिहून त्याची लेखणी बोजड झाली हें इतिहासकारही सांगू शकणार नाहींत. नेपोलियनच कशाला ? आपल्या तुकोबानी विठ्ठलाला खूप करून असाध्य असे वैकुंठ पदरांत पाडून घेतले. पण बायकोला खूप करण्यांच्याबाबतींत दुकानांतील खतावणी-प्रमाणें जमेची बाजू कोरीच राहिली. शंकराच्या उदात्ततेनें आणि उमेदीनें विषाचा प्याला पिणारा सॉक्रेटीस बायकोच्या नाराजी-पुढं नामोहरम झाला. या सर्वांत समर्थ खरे दूरदृष्टीचे संत. त्यांना खात्री होती कीं बायकोला खूप ठेवण्याचें प्रकरण आपल्याला झेपण्यासारखे नाहीं. तेव्हां तो प्रश्न निर्माण करून त्याची उत्तरें शोधीत बसण्यापेक्षां तो मुळांत निर्माण न करण्याची 'सावधान'ता बाळगणें अधिक श्रेयस्कर ! यापेक्षां त्यांना रानावनांत व डोंगरदऱ्यांत हिंडणें सोपे वाटले !

तुम्हींच विचार करा-जग जिंकायला निघालेल्या नेपोलियनसारख्या सम्राटाची ही स्थिति मग तुमच्या माझ्यासारख्या कांहींच न जिंकायला निघालेल्या बिचाऱ्यांबद्दल काय बोलावे ? तरी पण मी या गोष्टीवर अनेक वर्षें विचार करीत आहे-लग्न ठरल्यापासून तों घरभरणी आणि इतर कांहीं चटका लावणारे विधी होईपर्यंत खुषींत असणारी स्त्री संसारांतील पहिला रॉकेलचा डबा संपतो न संपतो तोंच कचरा अडकलेल्या स्टोव्ह-सारखी कां फुसफुसते ? बायको जोपर्यंत खुषींत असते तोपर्यंत खरा संसार सुरूच होत नसतो. ती खुषीचे शरणागतीचे निशाण उभारून पुरुषाला गाफील करते. हळुहळू

पुरुषाला वेसण घालते आणि एकदां कां तो घाण्याला जुंपला गेला कीं तिचा खुषीचा मुखवटा गळून पडतो. बिचारा पुरुष बायकोची वारंवार ढळणारी मर्जी सावरून धरण्यासाठीं भीमबळानें प्रयत्न करूं लागतो आणि संसाराला सुरुवात होते. प्रेमाप्रमाणें संसार हीहि दोघांनीं करावयाची गोष्ट असली तरी प्रत्यक्षांत पुरुष रोज सकाळ संध्याकाळ आंचवण्याच्या निमित्तानें आपल्या हक्कावर उदक सोडीत असतो आणि थोड्याच दिवसांत तो आपल्या व्यक्तित्वाला व स्वत्वाला आंचवतो ! नंतर जन्मभर बायकोला खूप ठेवण्यासाठीं तो जी केविलवाणी धडपड करतो त्यालाच थोर विचारवंतांनीं आणि भल्या साधुपुरुषानीं 'संसार' असें प्रौढ व गंभीर नांव दिलें आहे.

मी माझ्याकडे आणि आजुबाजूच्या लोकांकडे पाहून जेव्हां संसाराचा जमाखर्च मांडतो तेव्हां मला असं स्पष्ट दिसून येतं कीं नवरा झालेल्या पुरुषाचे निम्मे आयुष्य बायकोला खूष ठेवण्यांत जातें. आणि उरलेलें निम्में आयुष्य तिच्या नाखुषीची कारणें शोधण्यांत आणि तिला खूष कसे करावे याचा विचार करण्यांत जातें. पुरुषाच्या जीवनाची 'खूष खबर' ही अशी आहे ! बायकोला खूष करण्यासाठीं धडपडणारी नवरे मंडळी पाहिली कीं मला अगदीं गळू ठसठसल्यासारखें दुःख होतें. आमच्या वामनमामाची बायको तशी हसत खेळत जगणारी बाई. पण ती सदा नाखूष कां ? तर वामनमामाचं सुटलेलं पोट तिला बघवत नाहीं. आतां पोट सुटणं कां कुणाच्या हातातलं आहे ? कां वामनमामानं तें मुद्दाम सोडलं आहे ? पण नाहीं ! बिचारा वामनमामाही तिला खूप करण्यासाठीं भल्या पहाटें उठून पर्वतीवर काय पळायला जातो, संध्याकाळीं फर्ग्युसन कॉलेजच्या टेकडीवर काय चढतो ! पोटासाठीं बिचारा दाही दिशा धावतो. पण बायकोचें समाधान नाहीं. दरमहा त्याला पोटाचें माप बायकोला द्यावें लागतें. आज पांच वर्षें झालीं त्याच्या पोटाचा प्रश्न पोटाइतकासुद्धां सुटलेला नाहीं ! दादू शेळ्याची बायको एका सर्कसवाल्याची मुलगी ती लहानपणापासून जनावरांत खेळलेली. दादू कांहीं हत्ती घोडे वेणारा असामी नाहीं. पण बायकोला खूप करण्यासाठीं चार सहा मांजरे, दोनचार कुत्री, दोन पोपट, एक मैना, एक माकड, दोन ससे एवढा सरंजाम त्यानें जमवला आहे. ह्या सगळ्यांत त्याचं एक पोर कुठं लपून जातं हें कळतसुद्धां नाहीं. कित्येकदा तो पोर समजून माकडालाच जवळ घेऊन झोपतो !

आमचा सदोबा शिंत्रे. पोलादाच्या कांबीसारखा गडी. सबंध जिल्ह्यांत कुस्तीला जोड नव्हती. शक्तीचे प्रयोग करून पंचक्रोशीत नांव कमावलेला बहाद्दर. गांवचा वाघ म्हणायचे त्याला. आखाड्यांतल्या लाल मातीन मस्त रंगलेलं धोतर, बटनं नसलेला सदरा, रगेल नजर, चालींत गुर्मी, धोतरांतूनही मांडीचे फिरणारे पट दिसायचे. पण लग्न झालं आणि बायकोनं चीत केला – अगदीं चारी मुंड्या ! चार सहा गड्याना भारी असलेला हा वाघ बघता बघता बायकोनं गिळून टाकला. मातीला पाठ न लावलेला हा पहेलवान बायको नाराज होते म्हणून पाठीवर माती घेईनासा झाला. बायकोला खूष करण्यासाठीं केस वाढवून भांग पाडूं लागला. बायकोला घेऊन खालच्या मानेनं सिनेमाला जाऊं लागला. धोतर सोडून पँट घालू लागला. त्याच्या नजरेतली वाघाची गुर्मी गेली आणि तिथे कुत्र्याचा आज्ञाळभूतपणा आला. नाहीं म्हणायला त्याच्या कमावलेल्या शरिराचा एवढाच फायदा झाला कीं, बायको माहेरी निघाली किंवा परत आली कीं तिच्याजवळ कितीही सामान असले तरी मोटार स्टँडपासून घरापर्यंत हमालीसाठीं एकही पैसा खर्च होत नाहीं. कितीतरी वर्षानीं तो मला परवा भेटला. एकेकाळीं रानडुकरासारखा मस्तवालपणें चालणारा उस्ताद सदोबा पेकाटांत काठी बसलेल्या मरतुकड्या कुत्र्यासारखा समोरून चालत येत होता. बरोबर पांच-सात पोरांचा गोतावळा होता. मी त्याला ओळखलाच नाहीं. जवळ आल्यावर पाहिलं तर सदोबा. मी विचारलं, "अरे अरे ! सदोबा काय रे झालं हें तुझं अस्सं ? "

" हा संसार-बरं बाप्पा हा संसार ! आणि ही सगळी भोवताली आहेत ही त्या संसारवृक्षाची फळं ! "

" लेका, संसार तर सगळ्यांच्याच मागं आहे. "

" बायकोला खूष ठेवण्याच्या पायीं ही दशा झाली. तुला आठवतय् ? वाघ म्हणत असत लोक मला. आतां त्या वाघाचा एकसुद्धां पट्टा अंगावर राहिला नाहीं. तुझं लग्न नुकतंच झालय् कां ? तसं असेल तर एक गोष्ट कर बायकोला खूष करण्याच्या फंदांत पडूं नकोस " सदोबा कळवळून सांगत होता.

" मागच झालय्. तुझ्या उपदेशाला उशीर झाला. "

मला सदोबाची कींव आली. अरेरे ! केवळ बायकोला खूप करण्याच्या नादांत हा सदोबा वाया गेला ! पण मी जेव्हां माझ्याबद्दल विचार करूं लागलों तेव्हां मीही सदोबा आहे याची खात्री पटली. मग मी जरा आजुबाजूला पाहिलं तों सगळीकडेच सदोबा. घर आहे तिथं सदोबा आहे. कांहीं अगदींच सदोबा, कांहीं अल्प सदोबा, कांहीं किंचित् सदोबा, कांहीं मधून मधून सदोबा— मी मनू मानेच्या तोंडांत मारतील अशा दोन ओळी जुळवून टाकल्या.

ज्या ज्या घरांत 'बाबा आहे ।
त्या त्या घरीं सदोबा आहे ॥

अशा वेळीं शेजारचे माधवराव नवविवाहित तरुणाना जीव तोडून जें सांगतात तें कसं खरं आहे हें पटू लागतं. माधवरावांच्या मतें लग्नानंतरचे पहिले सहा महिने अत्यंत आणीबाणीचे असतात. या काळांत पुरुषानें डोळे उघडे ठेवून वावरलं पाहिजे. पण नेमके यावेळीं सर्व पुरुष झोपाळूपणानें वागतात. ह्या सहा महिन्यांत दोघांमध्यें एकप्रकारचं शीतयुद्ध चालू असतं. पुढच्या सबंध जीवनाचा डाव ह्या सहा महिन्यांत खेळला जातो. त्यांत जो जिंकतो तोच जन्मभर जेता राहतो. आणि शेंकडा ९९ प्रकरणांत स्त्रीच डाव जिंकते. आपल्याला बायको मिळाली याचाच पुरुषाला इतका आनंद होतो कीं तो पूर्णपणें गाफील बनतो. हातीं आलेली बायको नाराज होऊं नये म्हणून वाटेल तें करतो. आपलीं मतें बदलण्याची तयारी दाखवतो. व्यसनें सोडण्याचीं वचनें देतो. बायकोला आवडतील असे कपडे शिवतो. सारखी दाढी करतो. बायकोला आणि तिच्या मर्जीला एकाद्या फोडासारखा जपतो. तिला हरबऱ्याच्या झाडावरून उतरूं देत नाहीं. बायको सांगेल तें तें करतो आणि

जन्मभर पुरेल एवढी पश्चात्तापाची पुंजी गोळा करून ठेवतो. या गाफील काळांत बायको घरांतल्या सर्व नाड्या आपल्या हातांत घेते; आणि जन्मभर नवरा नाडला जातो.

माधवराव ह्या गोष्टी आंतड्याला पीळ पडेल अशा भाषेंत सांगतात. पण कोणीही त्यांचं ऐकत नाहीं. पण प्रत्येकजण माधवरावांना येऊन सांगतो कीं, 'माधवराव, तुम्ही म्हणतां तें खरं आहे–अगदीं शंभर टक्के खरं आहे, पण हें कबूल करतात ते सहा महिन्याचा काळ लोटून पराभूत झालेले लोक! एकंदरीत पुरुष कमकुवतच! तिकडची मर्जी संभाळून असावं' असा मुलीला आईबापांचा स्पष्ट आदेश असतांना सुद्धां ती तिकडे लक्ष देत नाहीं. आणि नवऱ्याला कुणीही न सांगता उत्स्फूर्त उत्साहानें तो बायकोची मर्जी सांभाळण्याच्या उद्योगाला लागतो याचा अर्थ काय?

माझ्याबाबतींत सांगायचं म्हणजे मीही याच माळेंतला आहे. मला जसे घरांतले ढेकूण पूर्णपणें नष्ट करणें कधींच जमले नाहीं, तसे बायकोची नाखुषी दूर करणेंही जमलेले नाहीं. माझा आणखी एक दोष असा कीं लोकं सांगतील ते उपाय करण्याची माझी संवय आहे. या संवयीपायीच माझ्या डोक्याचें टक्कल वाढलें आहे; कारण केंस वाढविण्यासाठीं लोकांनीं सांगितलेले उपाय मी केले! बायकोला खूष ठेवणाच्या बाबतींतही हीच स्थिति झाली आहे. इंग्रजी मासिकांतून प्रसिद्ध झालेलीं 'बायकोला खूष ठेवण्याची दहा सूत्रें' मी करुणाष्टकाच्या भक्तीनें पाठ केलीं आहेत. 'तुम्ही असे करता काय?' असा सवाल विचारून त्याखालील उत्तरांच्या गुणसंख्येवरून तुमचा संसार सुखाचा आहे दुःखाचा आहे याचा जबाब देणाऱ्या सदरांतील ९० गुण मी मिळवले आहेत. कुणी सांगितलं कीं बायकोचं कौतुक करावं. केलं. तिच्या सौन्दर्याचं, तिच्या भरतकामाचं, हंसण्याचं, रडण्याचं, कर्तृत्वाचं (अर्थात् कर्तृत्व म्हणजे काय हे मलाहि माहित नाहीं आणि तिलाहि), इतकंच काय केर काढण्यापासून उष्टी काढण्यापर्यंत प्रत्येक गोष्टीचं कौतुक केलं. तरी आठवड्यांतून पांच दिवस 'तुम्हाला माझं कौतुकच नाहीं' हें वाक्य कान सोडीत नाहीं. अर्थात् प्रसंग विविध.

"आज आमटी कशी झालीय्?" लग्न झाल्या दिवसापासून संसारांत अनेक प्रश्न निर्माण झाले आणि गेले. पण हा प्रश्न रोज ताज्या दमानं विचारला जातो.

"वा! अशी आमटी गेल्या तीन एक जन्मांत तरी खाल्ल्याचं मला आठवत नाहीं." मी.

"पण कशी झालीय् तें सांगाल कीं नाहीं?"

"आत्तां सांगितलं ना? जगांत या घटकेला आमटी करणाऱ्या कुठल्याही बाईला किंवा बुवाला इतकी चांगली आमटी करता येणंच शक्य नाहीं."

"हें नेहमीचंच आहे. खरं सांगा बरं—माझ्या गळ्याची शप्पथ आहे."

"आंबट झालीय् थोडी. चिंच जास्त झाली असावी."

"आज आमटीला चिंच घातलेलीच नाहीं."

"असं! मग बरोबर आहे. ते शेजारचे तात्या म्हणत होते मला कीं तुमचा चेहेरा आंबट दिसतोय् अलीकडं. त्याचा परिणाम आमटीवर झाला असण्याची शक्यता आहे." मी.

"अहो, एवढं कसं कळत नाहीं तुम्हाला? आज आमटींत चिंच नाहीं. आमसुलं घातली आहेत—"

"अरे वा! आमसुलं आहेत कां? मग मुळीच आंबट नाहीं हं आमटी."

"हेच तें. मी आज पहिल्यांदाच आमसुलं घालून आमटी केलीय्–पण तुम्हाला माझं कौतुकच नाहीं."

मी आमटींतून पिळून बाहेर टाकलेल्या आमसुलासारखा काळाजांभळा होतो. आणि हा दुसरा प्रसंग.

"आज नाटकाला जाऊं या—" मी [आपणहून असं सुचवणारा नवरा या भूतलावर अन्यत्र सांपडेल काय? जिज्ञासूनीं तपास करून पहावा.]

"आज तरी सुचलं म्हणायचं तुम्हाला"

"पण लौकर तयार हो. नाहीतर उशीर करशील."

"मी कधीच उशीर करीत नाहीं. तुम्हालाच घराला कड्या कुलुपं लावायला तास लागतो."

"हो, तूं म्हणतेस ते खरं आहे. तरी पण तूं लौकर आटप."

"आत्तां आटपतें. पण मी नेसूं काय?" बाहेर जाण्याचा ज्या ज्या वेळीं प्रश्न निर्माण

होतो त्या त्या वेळीं न चुकता हा नेसण्याचा उपप्रश्नही निर्माण होतो.

" साडी नेस " मी सुचवतो.

" तेवढं नको सांगायला कांहीं. माझी अडचण आहे ती कोणती साडी नेसायची ही ? "

" अग किमान तीस तरी साड्या आहेत घरांत. ती जरीची नेस. "

" ती नव्यांतली आहे. "

" असेना का ? "

" अहो, अशा नव्यांतल्या साड्या लग्न-मुंजीसारख्या समारंभाला नेसायच्या असतात " माझ्या अज्ञानाची कींव.

" मग जुन्यांतली नेस "

" जुनी साडी नेसून का नाटकाला जायचं ? "

मी दिङ्मूढ !

" मग आतां ? " मी–

" तुम्हाला कितीदां सांगितलं कीं अशा प्रसंगासाठीं कांहीं साड्या आणा म्हणून. पण तुम्ही एक तर एकदम भारी साड्या आणता नाहींतर एकदम साध्या साड्या आणता मधल्या साड्या आणीतच नाहीं. "

" चुकलं माझं "

" असं म्हटलं कीं संपलं—बायकोसाठीं एवढं सुद्धां करवत नाहीं. "

परिणाम—बायको नाराज !

कुणी सांगितलं कीं दर महिन्याला नव्या डिझाइनची साडी आणावी. दर शनिवारी मारुतीला तेल घालण्याच्या निर्धारानं मी दरमहा साडी आणली. परिणाम एवढाच झाला कीं दरमहा नवी साडी घरांत येऊं लागल्यानें तीन महिन्यांत साडी एकदम 'जुनेरं' होऊं लागली आणि मोलकरणीच्या अंगावर चढूं लागली त्यामुळें बायको जरी नाहीं ह्या उपायानें मोलकरीण खूप होते असा अनुभव आहे. अर्थात् तिचा नवरा तिला साडी आणीत नाहीं म्हणून मोलकरीण नाखूपच आहे हा भाग निराळा.

मधून मधून नव्या पद्धतीचे दागिने केले तरी जुन्या दागिन्यांचा घाट मनासारखा नाहीं म्हणून बायको नाराजच ! दर आठवड्याला सिनेमा, दर महिन्याला नाटक, याशिवाय प्रसंगी प्रदर्शन, विविध मनोरंजनाचे कार्यक्रम, सर्कस याचाही मारा चालूच असतो. तरी पण बहुतेक वेळा चांगला सिनेमा दाखविला नाहीं म्हणून, तर कधीं गर्दी नसलेल्या नाटकाला नेलें म्हणून (जणूं काय नाटकाला गर्दी होत नाहीं हा माझाच दोष असतो !) तर कधीं अगदींच पोरकट सर्कस दाखविली म्हणून बायको नाराजच !

भाजी आणणं, कापड (फक्त माझें) खरेदी करणं, मुलांना शाळेंत पोचवणं, त्यांचा अभ्यास घेणं, प्रसंगीं त्यांना अभ्यास करून देणं, शेजाऱ्याशीं भांडणं, मोलकरणीला दम देणं, भिकाऱ्यांना हुसकावणं, घराच्या आवारांत शिरलेल्या गाई, म्हशी, बकऱ्या वगैरे पशूंना हाकालणं, पाहुण्यापुढं खोटं हंसणं, देणेकऱ्यांचीं तोंडं चुकवणं, चैत्रांत गौर मांडून देणं, बायकांना हळदीकुंकवाचीं आमंत्रणं देणं, उशीरा हळदीकुंकवाला आलेल्या बायकांना सोबत म्हणून जाणं, बायकोनं रडवलेल्या मुलांना हंसवणं–किती म्हणून सांगावं ? इतकी कामं करून सुद्धां बायको मैत्रिणींत बेधडक सांगते कीं, " ह्याना तर घरच्या कामाला हातच लावायला नको ! " परमेश्वरा, तूं आहेस तरी कुठं ? तुझ्या दरबारीं न्यायच राहिला नाहीं कीं काय ?

ही यादी मी बायकोला वाचून दाखवतो तेव्हां तिच्या चेहेऱ्यावर माशी बसल्याइतका सुद्धां फरक पडत नाहीं. तिचं म्हणणं, एवढसं काम केलं तर त्याचा इतका कांहीं गाजावाजा करायला नको. दोन्ही वेळच्या स्वयंपाकाचा रगाडा मीच उपसतें. त्यांत तुम्ही इकडची काडी तिकडं करीत नाहीं.

तरी बरं मी अनेकदां पायांत आलेल्या कोथिंबिरीच्या काड्या खुद्द माझ्या हातांनीं मी बाहेर टाकल्या आहेत. अनेक वेळा स्टोव्ह पेटविण्याच्या निमित्तानें एकेका वेळीं वीस वीस काड्या जाळल्या आहेत. मी स्वयंपाकघरांत बायकोला जी बहुमोल मदत करतो तिचा तिला सोयिस्कर विसर पडत असला तरी स्टोव्हचा मोडलेला पाय, विळीचें तुटलेलें पातें, खलबत्त्याच्या आततायीपणामुळें फुटलेली फरशी त्याची साक्ष देईल. बरं केलेल्या मदतीबद्दल कृतज्ञतेचा एकादा शब्द तरी ऐकायचं कानांना भाग्य मिळावं ? तेंही नाहीं. कधीं भाजी चिरून दिली तर ती मोठी चिरली म्हणून बायको नाखूप होते. कधी फोडणी करून दिली तर ती जाळल्याबद्दल जळजळीत शब्दांचें तेल अंगावर उडते. कधी पोळी करण्याचा घाट घातला तर जिवानिशीं गेलेल्या शेळीच्या कातड्यासारखी वातड झाली म्हणून आरडा ओरडा होतो. चटणी वाटून दिली तर ती वाटलीच गेली नाहीं असा धडधडीत सत्यापलाप होतो (मला त्यावेळी काय वाटत असेल !) वाटेल तें पक्वान्न करण्याची माझी तयारी असूनसुद्धा 'तुम्ही जिनसांची वाटेल तशी उधळपट्टी करतां' असल्या क्षुद्र कारणावरून मला पक्वान्नापासून दूर ठेवले जाते.

शिवाय माझा कशालाही विरोध नसतो, कशाच्याही बाबतीत हट्ट नसतो, आग्रह नसतो पण या सर्व प्रयत्नांना फळ नाहीं. बायकोला खूप ठेवण्याची कला ज्याला साधली असेल त्याला माझी लाख वंदनें ! मला तरी अजून असा दिव्य पुरुष भेटला नाहीं. मी पारंगतांच्या मुलाखती घेतल्या, अनुभविकांतें वाट पुशिली, ज्ञात्यांना मार्गदर्शन मागितलें. पण कोणीही कामास आलें नाहीं.

हें सर्व आठवले म्हणजे मी हताश होतो. वैतागतों. आणि या वैतागाच्या भरांत माझ्या मनांत असा विचार येतो कीं, इतकं करूनही बायको खूष होतच नाहीं; मग हा नाद द्यावा सोडून आणि सरळ चप्पल घालून नेपोलियनसारखे जग जिंकायलाच बाहेर पडावं. पण तरवार आणि राजमुगुट नाहीं म्हणून मी अडलों आहे.



म्हणतात ना, 'कोंबडी वांचून उरुस नाहीं आणि भानगडी वांचून पुरुष नाहीं !'

# जीवन साधना



गांधीजी व्यक्तीचें जीवन सेवेकरितांच
मानीत असल्यामुळें व्यक्तिगत जीवन
अधिकाधिक शुद्ध होण्याकरितां
त्यांनीं व्रतांची साधना स्वीकारली होती.
गांधीजींच्या कल्पनेचें स्वराज्य आत्मराज्य होतें.
हें आत्मराज्य स्थापन करण्याकरितां
लोकांनीं करावयाची जीवनसाधना म्हणजे
विधायक कार्यक्रम होय.
त्या विधायक कार्यक्रमासंबंधीचे त्यांचे विचार
'विधायक कार्यक्रम—त्याचें रहस्य व स्थान'
यांत एकत्र ग्रंथित केलेले आहेत.
त्यांतील एक प्रकरण—

## *दारूबंदी यशस्वी कशी होईल ?*

जातीय ऐक्य आणि अस्पृश्यता–निवारण याप्रमाणेंच दारुबंदी ही देखील कॉंग्रेसच्या कार्यक्रमांत १९२० सालापासून समाविष्ट झालेली आहे. तरी या अगदीं जिव्हाळ्याच्या सामाजिक व नैतिक सुधारणेच्या बाबतींत कॉंग्रेसवाद्यानीं जितकें लक्ष घालावयास पाहिजे तितकें त्यानीं घातलेलें नाहीं. आपल्याला जर आपलें ध्येय अहिंसक प्रयत्नानें गांठावयाचें असेल तर दारू, अफू इत्यादि मादक पदार्थांच्या व्यसनामुळें जे लाखों स्त्रीपुरुष गांजले जात आहेत, त्यांचें भविष्य भावी सरकारवर आपल्याला सोडतां येणार नाहीं.

या अनिष्टाचें निराकरण करण्याचा कांहीं वैद्य व डॉक्टर लोकांना सर्वांत जास्त व परिणामकारक कामगिरी करतां येईल. दारूबाज व अफूबाज यांना त्यांच्या व्यसनापासून सोडविण्याचे उपाय त्यांनीं शोधून काढले पाहिजेत. ही सुधारणा घडवून आणण्याच्या कामीं स्त्रिया व विद्यार्थी यांना विशेष संधी मिळण्यासारखी आहे. प्रेमळपणानें सेवेचीं अनेक कामें करून त्यांना व्यसनी लोकांवर असा कांहीं प्रभाव पाडतां येईल कीं, त्यामुळें व्यसन सोडून देण्याच्या त्यांच्या विनंतीला मान देणें त्यांना भागच पडेल.

थकून भागून आलेल्या कामगारांना जेथें आराम घेतां येईल, आरोग्यदायक व स्वस्त फराळाचे पदार्थ मिळतील, आणि स्वतःच्या आवडीचे योग्य ते करमणुकीचे खेळ खेळतां येतील, अशीं विश्रांतीचीं व करमणुकीचीं गृहें कॉंग्रेस समित्यांना उघडतां येण्यासारखीं आहेत. हें सर्व काम मनाला आकर्षक व हृदयाला हलकें करणारें आहे. स्वराज्याचा अहिंसक मार्ग हा अभिनव मार्ग आहे. यांत जुनी मूल्यें जाऊन त्यांच्या जागीं नवी मूल्यें येतात.

हिंसात्मक मार्गांत अशा सुधारणांना वाव नसेलहि पण त्या मार्गावर आस्था ठेवणारे लोक आपल्या उतावळेपणानें किंवा वाटल्यास अज्ञानानें म्हणा, या सर्व गोष्टी मुक्तीच्या दिवसापर्यंत लांबणीवर टाकूं पहातात. चिरकाल टिकणारी व आरोग्यप्रद अशी मुक्ति आंतून—म्हणजे चित्तशुद्धीद्वारां—उद्भवत असते. ही गोष्ट ते विसरतात. विधायक कार्य करणाऱ्या लोकांना कायदेशीर दारूबंदीचा मार्ग प्रत्यक्ष तयार करतां आला नाहीं, तरी त्यांना तिचें काम सोपें व यशस्वी करतां येईल.

—महात्मा गांधी

# कोण म्हणतो, दारुबंदी अयशस्वी झाली ?

मोरारजीभाईंच्या मंत्रिमंडळांत दारुबंदी मंत्री म्हणून यशस्वीरित्या काम केलेले डॉ. **टी. आर. नरवणे** यांची, आमचे खास प्रतिनिधी श्री. श्रीकृष्ण ठाकूर यांनी घेतलेली ही उद्बोधक व स्पष्टवक्ति मुलाखत दारुबंदीबाबतचे लोकांचे गैरसमज दूर करील.



**प्रश्न १**—संयुक्त महाराष्ट्रावर गुजराथला द्यावयाच्या निधीचा जो भूर्दंड लादला गेला आहे त्यामुळें महाराष्ट्रामध्यें अर्थकारण सांभाळण्यासाठीं दारूबंदी नष्ट करावी काय ?

**उत्तर**—दारुबंदी हें राष्ट्रानें कित्येक दिवस अंगिकारिलेलें धोरण आहे. घटनेनें त्याला Directive Principals मध्यें स्थान दिलेलें आहे. त्याचा व राज्याच्या आर्थिक परिस्थितीशीं कांहीही संबंध नाहीं. कारण गेल्या ५० ६० वर्षांच्या हिंदी राष्ट्रीय चळवळी-मध्यें दारूच्या करापासून होणारें उत्पन्न ही न्याय्य उत्पन्नाची बाब म्हणून कधींहि मानलेलें नाहीं. अर्थात् राष्ट्रीय उत्पन्नाच्या बाबतींत अन्य कांहीं बाबी--राष्ट्रीय व नवीन योजनेच्या कामासाठीं—शोधाव्या लागतील.

हाच प्रश्न ज्यावेळीं मुंबईराज्यांत दारूबंदीचे धोरण अंमलांत आणायचें ठरलें त्यावेळींहि उत्पन्न झाला होता. अर्थात त्यानंतर बसवलेल्या सेल्स टॅक्सरूपी करामुळें, दारूबंदीमुळें बुडणारें उत्पन्न तर भरून निघाले व त्यापेक्षांहि सरकारचें इतर उत्पन्न जास्त वाढलें. बहुतेक सर्व अर्थशास्त्रज्ञांनीं दारूवरील कराला अन्याय्य व अयोग्य 'कर' असें मानलें आहे.

याबाबतीत दुसरी एक गोष्ट लक्षांत घ्यायला पाहिजे कीं दारूबंदी मुळें जरी वरकरणी सरकारी खजिन्यांत आलेली आवक कमी दिसली तरी जवळजवळ त्या कराच्या उत्पन्नाच्या चौपट पैसा जनतेकडे रहातो. व त्यामुळें जनतेची आर्थिक स्थिति सुधारण्याचें काम आपो-आपच होतें. सर्व विकास योजनांचे हेतू जनतेची आर्थिक स्थिति व रहाणी सुधारावी हाच असतो. व त्या दृष्टीनें जितक्या जितक्या प्रमाणांत दारूबंदी यशस्वी होईल तितक्या तितक्या प्रमाणांत जनतेची आर्थिक स्थिति, क्रयशक्ति सुधारलेली दिसून आल्याशिवाय रहाणार नाहीं.

**प्रश्न २ रा**—चोरट्या दारूभट्टीला आळा कसा घालणार ?

**उत्तर**—अर्थात् हे सर्व व्हायला दारूबंदी दिवसें दिवस जास्ती यशस्वी व्हायला पाहिजे. पण याबाबतींत घरोघर चोरट्या दारूभट्या आज चालू आहेत असा आरोप घेण्यांत येतो. याबाबतींत खालील गोष्ट लक्षांत घेतल्या असतां हा आक्षेप भासविला जातो तितका खरा नाहीं हें लक्षांत येईल.

(i) पहिली गोष्ट अशी कीं ज्यावेळीं मद्यपानावर कोणतीहि बंदी नव्हती त्यावेळींसुद्धां एकूण जें मद्यपान होत असे त्यापैकीं जवळ जवळ २५% मद्यपान हें चोरट्या गुत्त्यांतून व चोरट्या भट्टीपासून होत असे. टाटा इकॉनॉमिक इन्स्टीट्यूट व मुंबई युनिव्हर्सिटी यातील वेगवेगळ्या समित्यानीं दारूबंदीच्या प्राथमिक काळांत मुंबईराज्यांत ठिकठिकाणीं फिरून व राहून जी तपासणी केली त्यांतील रिपोर्टांत ही गोष्ट स्पष्टपणें नमूद करण्यांत आली आहे. तेव्हां चोरट्या दारूभट्या ही चीज कांहीं नवीन नाहीं. फक्त उघडी दारूची दुकानें बंद झाल्यामुळें या चोरट्या भट्ट्यांकडे जास्ती लक्ष वेधलें गेलें ही गोष्ट खरी. कांहीं प्रमाणांत या वाढल्या असण्या-चाहि संभव आहे. परंतु एकूण मद्यपान हें फार मोठ्या प्रमाणांत कमी झालें आहे हें मान्य करावें लागेल. मुंबईसारख्या शहरांत दारू पिऊन झिंगून घरीं आलेले शेंकडो कामगार चाळींतून दररोज दिसत असत. आज असें उदाहरण क्वचितच आढळून येतें.

(ii) चोरटी दारू पिणारांचें प्रमाण किती, याबाबत अभ्यास करण्यासाठीं म्हणून मुंबई कामगार विभागांत ३०–४० चाळी

निवडून कांहीं समाजसेवकांनीं सहा महिनेपर्यंत तेथील वस्तींत मिसळून जो रिपोर्ट केला त्यावरून निघणारे निष्कर्ष खालील प्रमाणें आहेत —

पूर्वी दारू पिणारांपैकीं, प्रचारामुळें असो अगर कायद्याच्या भीतिनें असो पण ५० % लोकांनीं मद्यपान सोडलेलें आहे. उरलेल्या ५० % मद्यप्यांपैकीं बहुतेक केव्हांना केव्हां चोरटी दारू पितात. पण त्यांचे पिण्याचे प्रमाण व पिण्याचे दिवस या दोन्ही बाबतींत निदान ५० % घट झालेली आहे.

( iii ) ज्यांना पूर्वी कधींच दारू पिण्याची संवय नव्हती अगर जे वयानें लहान होते असे नवीन मद्यपी किती तयार झाले याचा विचार केला तर पूर्वीच्या तुलनेनें १० % पेक्षां जास्त भर या संख्येंत पडलेली दिसत नाहीं. तात्पर्य, मद्यप्यांपैकीं शेकडां ५० % चोरटी दारू पितात पण तीहि अल्प प्रमाणांत पीत असल्यामुळें एकूण मद्यपानाचें प्रमाण शेकडां ७० % पर्यंत घटलें आहे असा निष्कर्ष काढण्यास हरकत नाहीं.

**प्रश्न ३ रा**—पोलीस हेच दारूबंदीच्या अयशस्वितेला कारणीभूत आहेत हें खरें का ?

**उत्तर** –चोरट्या दारूभट्टींचा वाढता पसारा जर रोखायचा असेल तर त्याची बरीच मोठी जबाबदारी पोलीस खात्याकडे आहे हें खरें आहे. पोलीसखातें हें कडक अंमलबजावणीच्या बाबतींत ढिलें आहे; किंबहुना तें अशा या गोष्टींत थोडेसें सामीलहि आहे. कदाचित् तें कानाडोळाहि करतें असा आक्षेप घेतला जातो. या आक्षेपांत थोडेंबहुत तथ्य असेलहि; पण त्याबरोबरच कायद्यांतील पळवाटा व जनतेची या बाबतींतली उदासवृत्ती व थोडीशी उपहासवृत्ती, या गोष्टीहि या चोरट्या मद्यपानाला पुष्कळ अंशीं कारणीभूत आहेत, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. 'आरोग्यासाठीं' या नांवाखालीं मध्यमवर्गीय व उच्चपदस्थ लोकांना दिले जाणारे 'हेल्थपरमिटस्' यामुळें दारूबंदीला जरूर असणारें नैतिक वातावरण फार मोठ्या प्रमाणावर नष्ट होतें. परवाना आहे म्हणून दारू पिणारा न्यायाधिश दारूबंदीच्या कायद्याच्या कलमावर बोट ठेवून मद्यप्याला जरी कायदेशीर शिक्षा देत असला, तरी त्यामुळें दारूबंदीला जरूर असणारी नैतिक भूमिका उत्पन्न होऊं शकत नाहीं. त्याचप्रमाणें कायद्यांतील अंमलबजावणी फार दिरंगाईची होत असल्यामुळें गुन्हेगारांना आपले गुन्ह्याचे गुत्ते चालू ठेवण्याला फार अवसर मिळतो. तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे, चोरी करणें हें पाप व गुन्हा, ही गोष्ट जशी जनमनांत बिंबली आहे तशी मद्यपान म्हणजे पाप अगर गुन्हा, अशी भावना जनमनांत दृढपणें रुजलेली नाहीं. किंबहुना गेल्या १५०–२०० वर्षांतील इंग्रजी राज्यांतील संस्कारानें मद्यपान हें प्रतिष्ठीतपणाचें लक्षण मानलें जाण्याची वृत्ति जी बळावली होती ती अद्याप नष्ट झालेली नाहीं.

तात्पर्य, दारूबंदी व्हावी तितकी यशस्वी न होण्याला जनमनाची बेपर्वाई, कायद्यांतील ढिलेपणा, व पोलिसांची कुचराई ह्या तिन्ही गोष्टी कमीजास्त प्रमाणांत कारणीभूत आहेत असें म्हणावयास पाहिजे.

**प्रश्न ४** – मुंबईत ताडीच्या बाबतींत निर्बंध सैल करावे या विधानाबद्दल आपले काय मत आहे ?

( पान ४९ वर चालू )



# महाभारतकालीन पंचमहापातकांतील एक— मद्यपान

ज्याप्रमाणें भारतीकालामध्यें आध्यात्मिक भावनेनें अहिंसाधर्माचा जय होऊन मांसाशनासंबंधानें भारती आर्यांच्या चालींत फरक घडला व निवृत्तिमार्गांत मांसाशन बिलकुल बंद पडलें; व प्रवृत्तिमार्गांत, यज्ञयागांत व श्राद्धांतच बाकी राहिलें, त्याचप्रमाणें मद्याच्या संबधानेंही भारती काळांत मोठेंच स्थित्यंतर घडून आलें. भारतीयुद्धकालीं म्हणजे प्रारंभीं प्रारंभीं भारतीय आर्य मद्य अथवा सुरा पिणें अशास्त्र मानीत नव्हते. क्षत्रियांत तर मद्यपानाची बंदी नव्हती, इतकेंच नव्हे, तर मद्यपानाबद्दल ते लोक पाश्चात्य आर्य—जर्मन लोकांप्रमाणेंच प्रसिद्ध होते असें म्हटलें तरी चालेल. या कामांत यादव लोक अग्रणी होते व द्वारकेमध्यें मद्यपानाचा फारच बंडावा होता. वृष्णि आणि यादव हे मद्यपान करूनच एकमेकांमध्यें भांडून आपसांत नाश पावले ही गोष्ट महाभारतांत वर्णिली आहे. बलराम तर अतिशय दारू पिणारा होता, हें प्रसिद्ध आहे. श्रीकृष्णसुद्धां जरी मद्य पिण्यामध्यें मर्यादित होता, तथापि सर्व क्षत्रियांच्या चालीरीतीप्रमाणें तोही मर्यादेनें मद्य पीत असे हें निर्विवाद आहे. श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या मद्यपानाचें वर्णन महाभारतांत दोनतीन ठिकाणीं आहे. रामायणामध्यें असें वर्णन आहे कीं, समुद्रांतून सुरा निघाली, तिचें ग्रहण देवानीं केलें म्हणूनच देवांस सुर ही संज्ञा मिळाली. महाभारतांतही एके ठिकाणी अशा प्रकारचा उल्लेख आहे. वरुणलोकांत सुराभवन कनकमय असून ही सुरा हातीं लागल्यानेंच देवांना सुर संज्ञा प्राप्त झाली. ( उद्यो० अ० ९८ भा० पु० ३ पान २५४ ). युधिष्ठिराच्या अश्वमेध प्रसंगाच्या उत्सववर्णनांत सुरामैरेय सागरः। असें त्याचें वर्णन आहे. म्हणजे यज्ञोत्सव समारंभांत सुरा व मैरेय यांची रेलचेल झाली होती असें वर्णन आहे. भारती युद्धकालीं क्षत्रिय विशेषतः यादववीर लढाईस जाण्याच्या वेळेस सुरापान करीत असत असें दिसतें. सात्यकी धर्माच्या आज्ञेनें अर्जुनाला मदत देण्यासाठीं कौरवसैन्यांत घुसण्यास तयार झाला तेव्हां त्यानें सुरापान केलें असें वर्णन आहे. "पीत्वा कैलातकं मधु" ( द्रो० अ० ११२ पा० ५२१ ) असें येथें नांव विशेष सांगितलें आहे. यदूंच्या वंशांत मराठे असून तेही "लढा-

( पान ५० वर चालू )





अनुक्रमणिका

( पान ९ वरून चालू )

हंसत तीं धन्याच्या हातावर त्यानें ठेवलीं, आमचा हा म्हातारा फार हुषार आहे, शिट् म्हणाले.

आज दुपारी साडेतीन वाजतां एअर-इंडियाच्या ऑफिसांत श्री. बंबावाल्यांना भेटावयाचें होतें. न्यू इंडिया इन्शुरन्स कंपनीचे मॅनेजर श्री. नानावटी यांची मोटर घेऊन आज ते सर्व जुनें नवें हॉंगकॉंग आम्हाला दाखवणार होते. बोटीवर जेवण करून पुन्हां रात्रीं ८ च्या सुमारास नाटक पहाण्याकरतां प्रो. शिट्च्या घरीं यायचें होतें. तेव्हां शिट् कुटुंबाचा निरोप घेऊन दुपारीं अडीचला मी बोटीवर परत आलों.

साडेतीनला एअरइंडियाच्या ऑफिसांत गेलों तेव्हां बंबावाले आलेच होते. हॉंगकॉंग ॲन्ड शांघाय बॅंके 'च्या उंच इमारतीकडे आम्ही नजर वळवली तों तिच्यापेक्षांहि गगनचुंबी अशी एक नवी कोरी आधुनिक इमारत दिसली. बंबावाले म्हणाले, ही चिनी सरकारनें बांधलेली 'बॅंक ऑफ चायना';—ही ब्रिटिशांच्या या बॅंकेपेक्षां वीस फूट अधिक उंच त्यानीं मुद्दामच बांधली! जुन्या हॉंगकॉंगच्या रस्त्यांवरून फिरत असतां मुंबईतल्या परळ-लालबागें-तल्यासारख्या जुनाट, धुरकट इमारती बऱ्याच दिसल्या. एका रस्त्याचें नांव होतें 'वान्-चाय स्ट्रीट.' हॉंगकॉंगच्या चिनी-पणाची खात्री पटवणारीं दृश्यें सर्वत्र दिसत होतीं. दुकानांसमोरच्या पिवळ्या किंवा पांढऱ्या खांबांवर एकाखालीं एक चितारलेलीं काळीं चिनी अक्षरें, रस्त्यावर दिसणाऱ्या तुकतुकीत काळ्या कपड्यांतल्या चिनी स्त्री पुरुषांच्या झुंडी, इमारतींच्या वरच्या मजल्यावरल्या खिडक्यांतून काठ्या बाहेर काढून त्यावर गुढ्या उभारल्याप्रमाणें सुकत घातलेले कपडे, सुक्या मासळीच्या दुकानांच्या दारावर तोरणासारखे टांगलेले हात हात लांब सुके मासे सर्व कांहीं अगदीं चिनी होतें.

तिथून आम्ही नव्या हॉंगकॉंगकडे मोर्चा वळवला. डोंगरांच्या रांगा, त्यांत लाल पिवळ्या मातीच्या कडेकपारी फोडून बांधलेले सुंदर बंगले, गर्द हिरव्या झाडीनें भरलेलीं दऱ्याखोरीं, पोहण्याची, खेळण्या-बागडण्याची सोय असलेले जुहू, लिडो, रिव्हिएरासारखे समुद्रकांठ, छोटीं मोठीं अद्ययावत हॉटेलें यांनी डवरलेलें हें हॉंगकॉंग आहे. मुंबईत ज्या साखरेच्या चौकोनांची पाकिटें मिळतात ती मोठी थोरली 'टायकू शुगर फॅक्टरी' वाटेंत दिसली. टायकू कामगारांकरतां बांधलेल्या लाल विटांच्या टुमदार घरांच्या रांगा पलीकडे दिसत होत्या. एंपायर थिएटरच्या दर्शनी भागावर सुंदर शिल्पकाम केलें आहे; आणि छपरावर रंगीबेरंगी निऑन प्रकाशाच्या कमानीवर कमानी आहेत. हॉंगकॉंगचा हा निसर्गरमणीय भाग इंग्लंड-सारखा दिसण्याची ब्रिटिश मालकांनी भरपूर खटपट केली आहे. टेकड्या, हिरवळ, त्यांतून सुंदर डांबरी रस्ते, टुमदार लाल हिरव्या छपरांचे इंग्लिश बंगले, हें सर्व आहेच; पण इंग्लंडचा परिपूर्ण भास व्हावा म्हणून कांहीं डोंगरकड्यांना पांढरा चुना फासून त्याना 'डोव्हर्क्लिफ्स्' असें नांवहि त्यांनी दिलें आहे! हॉंगकॉंगचा हा भाग म्हणजे आठदहा हिरव्या डोंगरदऱ्या आणि पांचसहा चिमुकल्या निळ्या उपसागरांचें नंदनवन आहे.

डोंगरावरून आमची मोटर खालीं येत होती तेव्हां बारीक झुरझुर पाऊस पडत होता. रेशमासारखी मऊ पिवळी पांढरी वाळू असलेल्या 'शेकोबीच्' वर आम्ही थोडा वेळ थांबलों, आणि तेथल्या 'डेरीफार्म रेस्टोरां' मध्यें समोरच्या निळ्या समुद्राची गंमत पहात चहा घेतला. पोहण्याकरतां तिथें येणाऱ्यांकरतां एका बाजूला रंगीबेरंगी चट्ट्यापट्ट्याच्या कापडाच्या तंबूंची रांग दिसत होती.

साऱ्या हॉंगकॉंगला पाणीपुरवठा करणारें 'तायताम् रिझर्व्हॉयर' पाहून तांबड्या छपराचा एक लहानसा तुरुंग आणि छोटीं छोटीं इंग्लिश नमुन्याचीं घरें असलेल्या स्टॅन्ले व्हिलेजमध्यें आम्हीं गेलों. गेल्या महायुद्धांत जपान्यांनी हॉंगकॉंग घेतलें तेव्हां हॉंगकॉंगला पाणीपुरवठा करणारें 'तायताम्' त्यानीं घेतलें; आणि स्टॅन्ले व्हिलेज मध्येंच कैद केलेल्या ब्रिटि-शांना डांबून ठेवलें होतें. तिथून 'रिपल्स बे' कडे गेलों. इथली उंच मनोरा असलेली 'लिडो हॉटेल'ची इमारत सुंदर आहे. इथला समुद्रकिनाराहि रमणीय आहे. समोर समुद्रांत तीन टेकड्या दिसतात. त्यांना 'तीन शिपाई' श्री सेन्ट्रीज असें नांव आहे म्हणतात. सुंदर तांबड्या रंगाच्या दगडांची फरशी असलेल्या गच्चीवर समोर दिसणाऱ्या समुद्राच्या लाटांचें नर्तन पहात पहात स्त्रीपुरुषांनी बॉलनृत्य करण्याची सोय आहे. हॉटेलच्या आसपास डोलणाऱ्या छोट्या तालवृक्षांनी आच्छादलेले छोटे रस्ते आणि रंगीबेरंगी फुलांची बाग आहे. या हॉटेलांत पापड कुर्डयासारख्या दिसणाऱ्या कसल्या तरी कुरकुरीत काचऱ्या आम्हीं खायला घेतल्या. त्या म्हणे गंधासारखें वाटून आणि सुकवून तळलेल्या माशाच्या मांसाच्या होत्या!

शेवटीं 'ॲबर्डीन' नांवाच्या छोट्याशा कोळीगांवाकडे गेलों. इथल्या समुद्रावर किती तरी चिनी होड्यांचे किंवा 'सांपन'चे तांडेच्या तांडे इतस्ततः तरंगतांना दिसत होते. मोठ-मोठीं जाळीं लोंबत असलेल्या होड्याहि पुष्कळ दिसल्या. ॲबर्डीनला नेहेमींच पुष्कळ प्रवासी आणि गुलहौशी चिनी, इंग्रज तरुण तरुणी येतात. इथलें विशेष आकर्षण म्हणजे समुद्रावरलीं तरंगतीं हॉटेलें. काश्मीरमधल्या हाऊसबोटीसारखीं मजले असलेलीं आणि सुंदर शृंगारलेलीं हीं हॉटेलें असतात. 'यूलो ताई' या ठळक अक्षरांतल्या नांवाची पाटी असलेली एक बोट आपले दिवे लुकलुकवीत समोरच पाण्यावर डुलत असलेली आम्हाला दिसत होती. या हॉटेलांत नाना प्रकारचे जिवंत मासे काचेच्या टाक्यांत फिरत ठेवलेले असतात. आपणाला हवा-तो मासा आपण दाखवावा; हॉटेलचा नोकर तो बाहेर काढून तुम्हाला अगदीं ताजा ताजा उकडून किंवा तळून देतो! या विशिष्ट हॉटेलांची ही विशेष गंमत आहे. किनाऱ्यावरून या हॉटेलांपर्यंत पोहोचविण्याकरतां निळ्या छप-रांचीं छोटीं छोटीं होडकीं घेऊन शेंकडों चिनी मुली गिऱ्हाइकांवर झडप घालण्याकरतां तयारच असतात. आम्ही मोटर उभी करून किनाऱ्याशीं खालीं पाऊल टाकल्याबरोबर 'माझ्या होडींत या—माझ्या होडींत या!' अशा अर्थाची चिनी किलबिल करीत अक्षरशः त्या पोरी आम्हां तिघाचौघांवर तुटून पडल्या! आम्हाला हॉटेलांत जायचें नव्हतें; पण त्या मुळींच ऐकेनात. बखोटीला धरून त्या आमची ओढाताण करूं लागल्या. बाकीचे कसेबसे निसटले; पण माझ्या दंडाला एक पोरगी बिलगली ती झटकतां झटकली जाईना! कसाबसा सुटलों आणि मोटरींत जाऊन बसलों. सर्वच प्रवाशांवर त्या अशा तुटून पडतात.

• •

( पान ४७ वरून चालू )

**उत्तर**—ताडीबाबतचे निर्बंध सैल करावे, ताडी पिणें म्हणजे मद्यपान नव्हे हा युक्तिवाद अगदीं भोंगळ आहे. दारुबंदीचा कायदा हा मुख्यत, गरीब व कामकरी समाजाला मद्यपानापासून मुक्त करून त्यांची आर्थिक व नैतिक पातळी उंचावण्यासाठीं केलेला आहे. व हा वर्ग मुंबई व इतर कोकण विभागांमध्यें मुख्यतः ताडी-माडीचे प्राशन करूनच खालावलेला आहे. अर्थात् ताडी माडीवरचे निर्बंध दूर करणें म्हणजे दारूबंदीच्या कायद्याचे मूळ उद्दिष्टच सोडून देण्याजोगें आहे.

ताडी माडीमध्यें 'अल्कोहोलचें' प्रमाण दारू अगर मद्य यापेक्षां कमी असेल पण त्यामुळेंच तीं फार मोठ्या प्रमाणांत प्यायली जाते हेंहि तितकेंच खरें आहे. त्यामुळें शरिरांत जाणारा 'अल्कोहोल' ताडीमुळें कमी जातो असें मानण्याचें कारण नाहीं. शिवाय यकृताचे वगैरे रोग ताडीच्या प्राशनामुळें फार लौकर उत्पन्न झालेले आढळून येतात-म्हणून ताडीवरील निर्बंध कोणत्याहि कारणानें सैल करणें चुकीचें ठरेल, एकदां कोणतीहि गोष्ट योग्य आहे असें ठरल्यानंतर तिचें पालन होत नाहीं म्हणून निर्बंध सैल करणें हा उपाय नव्हे, तर अपाय होय; विचारवंतांनीं या निर्बंधाचे पालन कसें होईल याचा विचार केला पाहिजे.

**प्रश्न** ५—मुंबई सरकारचें दारूबंदीचें धोरण फसलें आहे. पण ते कबूल करण्यास प्रतिष्ठा आड येते असें तुमचें मत आहे काय ?

**उत्तर**—दारुबंदीचें यश याचा अर्थ दारुचा टिपूसमुद्धां कुठें दिसणार नाहीं असा करण्यांत आल्यामुळें हें धोरण फसलें असा आभास उत्पन्न होतो. दारुबंदीचा कायदा केला, त्याची अंमलबजावणी केली व प्रचार केला तरी त्यामुळें वरील अर्थानें संपूर्णपणें दारुबंदीच्या धोरणाचे उद्दिष्ट जर सांगायचें झालें तर तें मी तरी खालील इंग्रजी वाक्यानें व्यक्त करूं इच्छितो.

Minimum Consumption for the present drinking population and no consumption for the next generation. याचा अर्थ आजच्या पिढीचे मद्यपान शक्यतों कमी करणें व नवीन पिढींत मद्यपि उत्पन्न होणार नाहींत अशी दक्षता घेणें हें दारुबंदीचें धोरण मानलें पाहिजे, व या दृष्टीने पाहिलें असतां दारुबंदीचें धोरण फसलें आहे असें म्हणतां येणार नाहीं. सर्व तऱ्हेनें प्रयत्न केला असता तर तें यापेक्षांहि जास्त जलद प्रमाणांत यशस्वी होऊं शकलें असतें, असें फारतर म्हणतां येईल.

**प्रश्न** ६ **वा**—इतर राज्यांत दारुबंदी नसतांना आमच्या राज्यांतील लोकांवर ही सक्ति काय म्हणून ?

**उत्तर**—भारतीय घटनेनें दारुबंदीचें धोरण स्वीकारिलें असल्यामुळें साऱ्या हिंदुस्थानामध्यें त्याबाबतींत कमी जास्त पावलें टाकलीं जात आहेत. मुंबई राज्य हे याबाबतींत थोडें आघाडीवर आहे इतकेंच. पण याबाबत वैषम्य वाटण्याऐवजीं वास्तविक अभिमान वाटावयास हवा. कारण इतर अनेक बाबतींतही इतर प्रांतांपेक्षां मुंबईराज्य आघाडीवर आहे. • •

[ पान ४७ वरून चालू ]

ईच्या वेळीं स्वतः सुरा पिऊन व हत्तींस पाजून लढाईस जात, मग कधींही माघारे फिरत नसत, " असें वर्णन ह्यूएनसांग चिनी प्रवासी यानें केलें आहे. असो. भारतांतील अनेक वर्णनांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, भारती युद्धाच्या काळीं क्षत्रियलोक सुरा पिणारे असून त्यांतील कित्येक अतिशय पिणारे होते. ब्राह्मणांतही त्या काळीं सुरा पिणारे असावे. शुक्राची कथा महाभारतांत आलीच आहे. शुक्राचार्य दारू पीत होते व त्यांना अतिशय नुकसान पोंचल्यामुळें त्यांनीं दारू पिण्याचें बंद केलें, परंतु ब्राह्मणांतलें हें व्यसन किंवा ही चाल शुक्राचार्यानें फार प्राचीनकाळींच बंद केली असली पाहिजे. भारती-युद्धकाळीं क्षत्रिय सुरा पीत होते त्याचप्रमाणें ब्राह्मण पीत होते कीं नाहीं याबद्दल निश्चयानें सांगतां येत नाही. तथापि ब्राह्मणकाळीं व उपनिषत्काळीं शुक्राचार्यानें घालून दिलेला नियम इतक्या कडकडीत रीतीनें अंमलांत आला होता कीं, सुरापान हें पंचमहापातकांपैकीं आहे अशा प्रकारचें निर्बंधन धर्मशास्त्रांत घातलें गेलें. हा निषेध सर्व आर्य लोकांस लागू होता म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तिघांना सारखाच लागू आहे. परंतु हा नियम ब्राह्मणांस तर विशेषतः लागू आहे असें ठरलें. ही पंचमहापातकें उपनिषदांतही सांगितलेलीं आहेत. यावरून सुरापानाचा दोष फार प्राचीनकाळा-पासून मानलेला आहे. भारतीयुद्ध-काळींही तो ब्राह्मणांनीं मान्य केलेला असावा; असें नसलें तरी भारती काळांत हा निर्बंध पक्का कायम होऊन महाभारतकाळीं ब्राह्मणांना सुरा इतकी वर्ज्य होती कीं, ब्राह्मणांचें ब्राह्मण्यच मद्यप्राशनानें नाहींसें होतें असें शास्त्र ठरलें होतें. ब्राह्मणांना सुरापानापासून ब्रह्महत्येप्रमाणेंच पातित्य उत्पन्न होतें असें ठरलें. याची साक्ष शांतिपर्वांत अध्याय १४० यांत विश्वामित्र व चांडाल यांची एक मनोरंजक कथा दिली आहे तिज-वरून चांगली पटते. एके काळीं बारा वर्षें अवर्षण पडल्यामुळें भयंकर दुष्काळ पडल्यावर विश्वामित्र भुकेनें कासावीस होऊन इकडे तिकडे अन्नासाठीं फिरूं लागला. त्या वेळेस एका चांडालाचें घर त्याला दिसलें व त्यांत एका मेलेल्या कुत्र्याची तंगडी त्यास दिसली. लपत छपत विश्वामित्र आंत शिरून तंगडी चोरून घेऊन जाऊं लागला, त्या वेळेस चांडालानें विश्वामित्रास हटकलें. तेव्हां विश्वामित्रानें केलें हें योग्य केलें कीं काय, ह्यासंबंधानें चांडालाचा व विश्वामित्राचा मोठा मजेचा संवाद झालेला आहे. त्या संवादांत विश्वामित्रानें चांडालास सरते शेवटीं असें म्हणून गप्प बसविलें कीं, बाबा ! मला धर्म सगळा समजतो आहे. चोरी करणें किंवा कुत्र्याचें मांस खाणें हें पातक आहे; पण त्याला प्रायश्चित्त आहे. 'पतित' हा शब्द फक्त सुरापानाच्या संबंधानें धर्मशास्त्रांत सांगितलेला आहे. 'नैवातिपापं भक्षमाणस्य दृष्टं सुरां तु पीत्वा पततीति शब्दः।' सुरापानाचें पातक याप्रमाणें अतिशय भयंकर मानलें जात होतें व त्या पातकाला प्रायश्चित्तही नव्हतें असें यावरून महाभारतकाळींही ठरलें होतें असें लोक मानीत त्या ब्राह्मणासंबंधानें लोकांत पूज्य बुद्धि होती. 'यस्य कायगतं ब्रह्म मद्येनाप्लाव्यते सकृत्।' वगैरे मनुस्मृतींतही सांगितलेलें आहे. मद्यपानाला कोणत्याही स्थितींत प्रायश्चित्त नाहीं ही गोष्ट महाभारतकाळींही मान्य होती; इतकेंच नव्हे, तर कलियुगांतहि शिसोदे वंशाच्या रजपुतां-तहि मान्य होती हें इतिहास-प्रसिद्ध आहे. या वंशांतील एका राजास औषध म्हणून वैद्यानें मद्य दिलें. हें त्यास कळल्यावर त्यानें पुरोहितास विचारिलें, "जो मद्य पिईल त्यास काय प्रायश्चित्त आहे ?" तेव्हां त्यानें राजास असें सांगितलें, "शिसें पातळ करून त्याचें घशांत ओतावें." त्याप्रमाणें राजानें प्रायश्चित्त घेऊन प्राण दिला; तेव्हांपासून या वंशास शिसोदे हें नांव पडलें. असो. महाभारतकाळीं ब्राह्मण लोकांनीं सुरा पूर्णपणें वर्ज्य केली होती ही गोष्ट शांतपर्वांतील मोक्षधर्म अध्याय १८० यांतील एका मजेदार श्लोकावरूनही दृष्टोत्पत्तीस येते. एक गरीब ब्राह्मण एका श्रीमंत उन्मत्त झालेल्या वैश्याच्या रथाच्या धक्क्यानें खालीं पडला. तेव्हां तो अतिशय खिन्न होऊन आपल्या दीन स्थितीविषयीं शोक करूं लागला. "अशा गरीब ब्राह्मणाचा जन्म फारच दुःख देणारा व दुर्दैवाचा आहे."— असा तो विलाप करीत असतां इंद्र एका कोल्ह्याचें रूप घेऊन त्याच्यापाशीं आला आणि त्याच्या ब्राह्मण्याची तारीफ करून त्याचें समाधान करीत असें म्हणाला कीं, "तूं ब्राह्मण झाला आहेस तरी तूं फारच भाग्यवान् आहेस. हा जो तुला लाभ झाला आहे त्यांत तूं संतुष्ट असलें पाहिजे. मी शृगालयोनीत उत्पन्न झालों आहें. तेव्हां माझे पदरीं किती पाप आहे !" वगैरे गोष्टी सांगतांना इंद्रानें म्हटलें "तुला मद्याचें आणि लट्वाक पक्षाच्या मांसाचें कधींही स्मरण होत नाहीं आणि वास्तविक पाहिलें तर या जगतांत त्यांच्याहून मोदक व अधिक गोड पदार्थ कोठेंही नाहीं. 'न त्वं स्मरसि वारुण्या लट्वा-कानां च पक्षिणाम्। ताभ्यां चाभ्यधिको भक्ष्यो न कश्चिद्विद्यते क्वचित्॥'" शां० अ० ३१ (भाषां० पुस्तक ६, पान ३७३). असो. मद्यासारखें मोदक व लट्वाक-पक्ष्याच्या मांसासारखे गोड पदार्थ ब्राह्मणांनीं निवृत्तिधर्मास प्रधान मानून केवळ आपखुशीनें सोडून दिले होते. या कारणानें अशा ब्राह्मणांची समाजावर छाप बसून भारती आर्यांच्या समाजाचे ते अग्रणी व धर्मगुरु झाले, यांत आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. ब्राह्मणांनीं सुरेचा महाभारतकाळा-पूर्वींच जो सर्वथैव त्याग केला, तो अजूनही त्यांचा महिमा कायम आहे आणि कित्येक क्षत्रियांनींही हाच कित्ता गिरविलेला आहे. एकंदर भारतीय लोकांचें मद्यपानाचें व्यसन महाभारतकाळीं फारच कमी होतें यांची साक्ष ग्रीक इतिहासकारहि देतात. मेग्यास्थिनीसच्या ग्रंथावरून स्ट्रेबो या इतिहासकारानें असें लिहलें आहे कीं, "हिंदुलोक यज्ञाशिवाय दुसऱ्या कोणत्याही प्रसंगीं दारू पीत नाहींत" मॅक्क्रिंडल् यानें याजवर अशी टीका केलेली आहे कीं, हा उल्लेख सोम-बहुधा रसाच्या पानाचा असावा. परंतु तसेंच केवळ म्हणतां येत नाहीं. 'सौत्रामण्यां सुरापानं।' असें वचन धर्मशास्त्राचें प्रसिद्धच आहे. सौत्रामणी नांवाच्या यज्ञांत सुरा प्यावीच लागत असे. परंतु इतर यज्ञांतसुद्धां अति प्राचीनकाळीं उत्सवाच्या निमित्तानें सुरा पीत असत. युद्धिष्ठिराच्या अश्वमेधवर्णनांत सुरा प्यायल्याचें वर्णन आहे. त्याच-प्रमाणें द्रोणपर्वांतील षोडशराजीय आख्यानांत अध्याय ६४ यांत सुरापान केल्याचें वर्णन आहे. तथापि, हीं सर्व वर्णनें भारतीकाळाच्या पूर्वींचीं होत. महाभारतकाळीं ब्राह्मणांनीं 'नित्यं सुरा ब्राह्मणानाम्।' हाच नियम मान्य केला होता, व इतर लोकांतही केवळ उत्सवाच्याच प्रसंगानें दारू पिण्याचें व्यसन दिसत असे. परंतु इतर प्रसंगीं लोक दारू पीत नसत. ● ● ●

एक मराठी लोककथा



जी लाभली असतां
निमिषांत वैभवाच्या शिखरावर
आरूढ होतां येतें
अशी
ही

# अद्‌भुत कल्पद्रुमी

— गोपालकृष्णन्

आपल्या जीवनांतील एक थोर उद्दिष्ट साध्य झाल्याच्या आनंदांत स्वर्णसुंदरीला बरोबर घेऊन सर्व राजमंडळासह राजा नरेंद्र निपाधापुरीस परत आला.

माल्यांग देशाच्या लोकबंधू विश्वजीत राजाचा तो एकुलता एक मुलगा. वयाच्या सातव्या वर्षींच त्याचे वडील वारले. आणि त्याच्या अज्ञानपणाचा फायदा घेऊन, त्याच्या चुलत्यानें सर्व राज्य बळकावून नरेंद्राला आणि त्याच्या आईला गुतपणें देशोधडीला लावलें. स्वार्थापायीं एखाद्यावेळीं नरेंद्राच्याहि जिवाचें कांहीं बरें वाईट करायला, त्याचा हा चुलता मागेंपुढें पाहाणार नाहीं, या रास्त शंकेनें, नरेंद्राच्या आईनें कधीं रानावनांत तर कधीं दऱ्याखोऱ्यांतल्या आदिवासी लोकांत लपत छपत, नरेंद्र वीस वर्षांचा होईपर्यंत अत्यंत खडतर वनवास भोगला.

नरेंद्र तरी बिचारा काय करणार ? पदरीं शिक्षण नसल्यानें आई-बरोबर भिक्षांदेहि करण्यावांचून त्यालाहि गत्यंतर नव्हतें. रस्त्यांत थंडीनें कुडकुडत असलेल्या एका बेवारशी मर्तुकड्या मांजराची सुश्रुशा करून त्यानें त्याला वांचवलें. आणि आजकाल त्याच्याशींच उरलेल्यावेळीं तो खेळत बसे.

जे लोक आपले आश्रित होते त्यांच्याशींच आपल्याला भिक्षांदेहि करावें लागतें, या विचारानें राणीला अत्यंत वाईट वाटे. शेवटीं एक दिवस ती नरेंद्राला म्हणाली,

" बाळा आतां तूं मोठा झालास, आपण कोण होतों हेंहि तुला ज्ञात आहेच; परंतु असं भिक्षेनं पोट भरण्या पेक्षां कांहीं तरी वेगळा व्यवसाय करून, मानानें आपण उदरनिर्वाह करूं. मजजवळ शंभर मोहरा आहेत, त्या घे, आण कांहीं व्यापार करून त्यावर मिळालेल्या फायद्यावर आपण जगूंया. "

आईची आज्ञा शिरसावंद्य मानून व्यापार करण्याकरितां राजकुमार नरेंद्र गांवातल्या बाजारांत गेला खरा; परंतु काय व्यापार करावा हेंच त्याला कळेना, शंभर मोहरा घेऊन तो दिवसभर फिरला; आणि अखेर कंटाळून आंबलेल्या मनानें आईकडे परत येतानां एका दृष्यानें त्याच्या मनांत कालवाकालव उत्पन्न केली. एक गारुडी एका सापाला फास लावून पकडून नेत असल्यानें त्यानें पाहिलें. त्याचें अंतःकरण द्रवलें. जवळ जाऊन तो त्या गारुड्याला म्हणाला.

" सोड सोड त्या मुक्या प्राण्याला ! "

" शक्य नाहीं, याला पकडण्या करितां आज दोन महिने खटपट करीत होतों, अखेर गावला. आतां याचे खेळ करून मीं निदान शंभर मोहरा तरी कमवीन. "

" पण शंभर मोहरा दिल्या तर तूं त्याला सोडशील काय ? " नरेंद्राचें राजघराण्याचें रक्त उसळून आलें.

" पण तुम्हीं कशाला या फंदांत पडतां दादा, आमचा तो पिढिजात धंदा आहे ! " आश्चर्यानें थक्क झालेला गारुडी म्हणाला. बहुधा हा कुणी वेडा पीर असावा असें त्याला वाटलें. अखेर आपल्या जवळच्या शंभर मोहरा त्याच्यापुढें ठेवून नरेंद्रानें त्या गारुड्यास सापाला सोडायला लावलें. एक महापुण्य जोडल्याच्या समाधानांत नरेंद्र निवासाकडे परतत होता; तोंच त्याला कुणीं तरी बोलवत असल्याचा भास झाला. त्यानें मागें वळून पाहिलें. आपली उंच उभारलेली फणा डोलवत तो साप त्याला मनुष्यवाणीनें बोलवत





अनुक्रमणिका

होता. क्षणभर तो शहारला; आश्चर्यचकित झाला परंतु धीर धरून तो त्या सापाजवळ गेला. साप नरेंद्राला सांगू लागला.

" वासुकीचा मी नातू, पृथ्वीवर आम्ही कधींच येत नाहीं; परंतु चुकून मी तिच्या सृष्टिसौंदर्याची शोभा बघत बघत आलों. गारुडी आणि गरुड हे आमचे दोन शत्रू. आणि आज दुर्दैवानें मी गारुड्याच्याच हातांत सांपडलो. तूं मला जीवदान दिलेंस. त्याबद्दल तुझेंहि कांहीं कल्याण मला केलंच पाहिजे. ही एक आंगठी घे. हिचें नांव 'कल्पद्रुमी' ही बोटांत घालून शेषाचें स्मरण केलेंस कीं जें जें इच्छिशील तें तें सर्व तुला मिळेल ! परस्त्री आणि सुरा ह्या दोन गोष्टी मात्र मागूं नकोस. घे ही सांभाळ, कुणाच्याहि हातीं लागूं देऊं नकोस. " आणि ती आंगठी नरेंद्राला देऊन तो सर्पराज गुप्त झाला.

आंगठी घेऊन नरेंद्र आईजवळ आला. त्या आंगठीला धारण करून त्यानें शेषाचें स्मरण करून नवें राज्य मागितलें. आणि यानंतर जें जें कांहीं हवें होतें तें तें सर्व त्यानें त्या कल्पद्रुमीच्या वरप्रभावानें मिळवलें. आतां त्याला फक्त एक लावण्यवती आणि अद्वितीय गुणवती अशी पत्नी हवी होती. आणि तिलाच म्हणजे स्वर्णसुंदरीला घेऊन तो आपल्या नवनिर्मित निषाधापुरींत परत आला होता.

राजमहालांत पाऊल ठेवतांच एकांत साधून स्वर्णसुंदरी म्हणाली, " नाथ ईश्वराच्या दयेनें मला तुमच्यासारखा भाग्यशाली पुरुष पति म्हणून मिळाला. माझ्या सर्व मनकामना पूर्ण झाल्या परंतु रोज अरुणोदयाच्या पूर्वी समुद्रस्नान करून प्रथम माझ्या सासूचे आणि नंतर तुमच्या चरणांचें दर्शन घेणें हें माझें व्रत आहे. तरी माझ्या अंतःपुरापासून समुद्र किनाऱ्या पर्यंत एक गुप्त भुयार माझ्यासाठीं तयार करा. तेणें करून दुसऱ्या कुणाची नजर माझ्यावर पडणार नाहीं ! "

" बस, एवढेंच ?" असें म्हणून राजा नरेंद्रानें हास्य मुद्रेनें कल्पद्रुमीला बोटांत घालून शेषाचें स्मरण केलें आणि क्षणार्धांत अंतःपुरापासून समुद्रकिनाऱ्यापर्यंत अत्यंत आकर्षक असें भुयार तयार झालें. नित्य नियमानें त्या भुयारांतून जाऊन राणी स्वर्णसुंदरी अरुणोदयापूर्वी समुद्रस्नान करून परत येई. आणि सासू आणि पतीचें चरणप्रक्षालन करून गृहकृत्याला लागे.

\+ + + +

कांचीपुरीचा राजा विषयमति हा अत्यंत मदांध आणि विलासी होता. त्याच्या राज्यांत लोक मद्य तयार करण्यांत फारच निपूण होते. निरनिराळ्या फुलां-फळांपासून अर्क काढून त्याचें मद्य तयार करणें हा त्यांचा मोठा धंदा होता. स्वतः राजा मद्य सेवनांत आणि शिकार करण्यांत दंग असे. यावरून ' यथा राजा तथा प्रजा ' हीही म्हण त्या कांचीपुरीला लागू होती. एक दिवस राजा विषयमति शिकारीसाठीं फिरत फिरत चुकून निषाधापुरीच्या समुद्रकिनाऱ्याला पोंचला. घोड्यावरून खालीं उतरून किनाऱ्यावर तो थोडा विसावला आणि थकलेलें पाय पाण्यांत बुडवून परत घोड्यावर बसायला निघाला. आपल्या पायाच्या आंगठ्याला कांहीं तरी गुंडाळलें गेलें असें राजाला जाणवलें; आणि वांकून राजानें तें सोडवलें. आंगठ्यापासून सोडवलेला तो एक केस होता. तसा केस आजपर्यंत राजानें पाहिला नव्हता; तो मानवी स्त्रीचा असावा हें नक्की; परंतु ही स्त्री कोण असावी बरें ? आणि असा हा सोनेरी केस ज्या स्त्रीचा असावा, ती स्त्री अत्यंत सुंदर असली पाहिजे ! ती सुंदर असली तर ती आपल्या रंगमहालांत नसावी याबद्दल राजाला वाईट वाटलें. तो केस जपून ठेऊन विषयमति राजधानींत परतला. राज्यांत परततांक्षणींच त्यानें दवंडी पिटली कीं " जो कोणी असल्या या केसांच्या स्त्रीची प्राप्ति राजाला करून देईल त्याला अर्धें राज्य इनाम देण्यांत येईल. "

ती दवंडी ऐकतांच कांचीपूरीचे सर्व लोक तो केस पाहून गेले; परंतु अति मद्य सेवनाने त्यांची बुद्धि नाठी झाल्यानें एकालाही तो पैजेचा विडा उचलतां आला नाहीं. शेवटीं एका चाणाक्ष आणि हुषार म्हातारीनें तो विडा उचलला. तो केस कुठल्या देशांत मिळाला, कसा मिळाला, कोणत्या वेळीं मिळाला याची खारी-पुरी माहिती घेऊन आणि सहा महिन्यांचा अवधी घेऊन ती निघाली. जातांना तिनें आपल्या गांठोड्यांत एकच एक वस्तु घेतली ती म्हणजे, क्षणार्धांत गुंगी आणणारी जालीम मद्याची अशी एक मोठी कुपी.

राजानें दिलेल्या पक्क्या माहितीवरून ती थेट निषाधापुरीच्या समुद्र किनाऱ्यावर आली. बारीक निरीक्षण करतां करतां तिथें एक भुयाराचें दार असल्याचें तिच्या नजरेस आलें. " याच भुयारांतून कदाचित माझें भाग्य उदयाला येईल ", असें अस्फुट उद्गार काढून म्हातारी दिवसभर तिथेंच थांबली.

या दिवसभऱ्यांत तिनें आजूबाजूचीं बरीचशीं सुकीं लांकडें गोळा करून रात्र पडतांच एक मोठा जाळ करून त्याच्या शेजारीं ती बसली.

पाव रात्र संपली, अर्धी संपली, तरी तिच्या कल्पनेप्रमाणें भुयाराच्या दरवाज्यांतून कुणीहि आलें नाहीं. कोंबड्याच्या पहिल्या सादाला मात्र भुयारांतून अस्पष्ट असा पावलांचा आवाज येत असल्याची तिला चाहूल लागली. म्हातारीनें लगेच त्या पेटत्या विस्तवाजवळ बसून मोठमोठ्यानें आक्रोश करायला सुरुवात केली.

भुयारांतून स्वर्णसुंदरी बाहेर आली आणि एकाएकीं तिच्या कानावर एका स्त्रीचा आक्रोश पडल्यानें ती चकित झाली. तिचें हृदय व्याकूळ झालें. एवढ्या रात्रीं कसलेंच न्यून नसलेल्या आपल्या राज्यांत समुद्र किनारीं बसून एका स्त्रीनें रडावें हें तिच्या मनाला फार लागलें. ती त्या स्त्रीच्या जवळ आली. म्हातारी संधि पाहातच होती. तिनें धांवत जाऊन स्वर्णसुंदरीला घट्ट मिठी मारली. आणि नाटकी-पणानें स्फुंदस्फुंदत ती म्हणाली.

" बाळे कसं ग तुला मला सोडून एकटीला राहवलं ? आतां या क्षणीं जर तूं मला दिसली नसतीस, तर नक्कीच मी स्वतःला जाळून घेऊन आत्मार्पण करणार होतें; पण माझं दैव बलवत्तर, म्हणून परमेश्वरानें माझी तुझी भेट घडवून आणली. " असें म्हणून ती स्वर्णसुंदरीला कुरवाळूं लागली. एकंदर प्रसंगानें विचारी स्वर्णसुंदरी हतबुद्ध झाली; परंतु स्वतःला सांवरून घेत ती म्हणाली,

" बाई ग मीं या राज्याची राणी असून रूपनगरची मी राजकन्या आहे. कदाचित् असंहि असूं शकेल, कीं माझ्यासारखीच दिसणारी अशी तुझी मुलगी असावी आणि ती मींच असा तुझा समज झाला असावा. पुष्कळदां साम्यामुळें तसा गैरसमज होतो. " परंतु म्हातारी एवढें ऐकून थोडीच बधणार होती. तिनें आणखी मोठ्यानें आक्रोश केला आणि तिचे पाय धरून ती म्हणाली,

"नाहीं नाहीं शक्य नाहीं. तूंच ती. मला इतके दिवस विरहांत ढकलून माझी अशी परिस्थिति करणारी तूंच ! आतां जर तूं मला जवळ केलं नाहींस तर मीं या आगींत उडी घेऊन प्राणत्याग करीन ! " स्वर्णसुंदरीनें तिचें सांत्वन केलें, तिला समजावलें, आणि आपल्या पतीची आज्ञा घेऊन मगच तिला घेऊन जायचें वचन देऊन, स्नान करून ती महालांत परतली. घडलेली गोष्ट तिनें पतीच्या कानावर घालून आणि सासूचें आणि पतीचें मत घेऊन त्या म्हातारीला तिनें राजगृहांत आणलें आणि मावशी या नात्यानें तिची सर्व चोख व्यवस्था ठेवली. म्हातारी मोठी चाणाक्ष. तिनें राजा नरेंद्राला तसेंच तिच्या आईला आपल्या धूर्त आणि नाटकी स्वभावानें एक दोन दिवसांतच गुंडाळलें. पुढें पुढें तर राजाला तसेंच स्वर्णसुंदरीला मावशीशिवाय पाऊलहि उचलेनासें झालें. इतकी म्हातारीनें त्या दोघांवर मोहिनी घातली. एक दिवस राजा नरेंद्र लहरींत येऊन म्हणाला "मावशी, या मोसमांत न मिळणारें असें कसलेंही एक फळ तूं माझ्याजवळ माग, मीं तें तुला इथल्या इथें देईन." ते दिवस आंब्याचे नसल्यानें म्हातारीनें आंबेच मागितले. राजानें क्षणार्धांत आंगठी बोटांत घातली आणि शेषाचें स्मरण केलें तोंच पिवळ्या धमक अमृतोपम रसाळ आंब्यानें भरलेलें असें एक भलें थोरलें ताट राजाच्या हातांत आलें आणि राजानें ते आंबे सर्वांना खाऊं घातले. म्हातारी स्तिमित झाली. ज्या कामासाठीं आपण आलों तें अशक्य आहे, आणि जर का राजाला संशय आला तर अशी किमया करणारा हा महाबलाढ्य राजा आपल्याला निमिषांत नाहीसें करायला मागें पुढें पाहाणार नाहीं. असा विचार येऊन तिचे हात पाय थरथरायला लागले; तरी पण तिनें स्वतःला सांवरलें. आधीं तिनें स्वर्णसुंदरीजवळ राजाच्या या सामर्थ्याचें गुपीत म्हणजे 'कल्पद्रुमी' नांवाची आंगठी आहे हें जाणून घेतलें. आणि खूप विचार करून आपलें कार्य साधायची तिला एक युक्ति सांपडली. "आहे एक युक्ति आहे." म्हातारी मनाशीं म्हणाली. " या राज्यांत अजून मद्य हें काय आहे हें कुणाला माहित नाहीं. अजून साडेपांच महिने अवकाश आहे, त्याच्या आधीं या मद्याच्या जोरावर मी आपला कार्यभाग उरकूं शकतें. " आणि तें साध्य झालें नाहीं, तर मात्र आपली धडगत नाहीं. असेहि विचार तिच्या मनांत आले; परंतु तिला खात्री होती. एकदां का आपली ही सुचलेली युक्ति सफल झाली तर सुवर्णसुंदरीची प्रातीच काय, राजा नरेंद्र आणि त्याचें हें सर्व राज्य धुळीला मिळवायला आपल्याला लागायचा नाहीं. या मद्यानें कांचीपुरीची काय दशा केली आहे हें उदाहरण तिच्या डोळ्यांसमोर होतेंच. एक दिवस राजा नरेंद्राला ती म्हणाली, " महाराज आपल्या उपकारानें आपण मला ऋणि करून ठेवलेलें आहे. या उपकारांतून थोडी तरी उतराई होण्याकरितां, मजकडून आपण कांहीं सेवा घ्यावी. " राजा



## दारुबंदीमुळें लेखकाचाहि फायदा झाला

पन्हाळा ( कोल्हापूर जिल्हा ) येथील एक लेखक श्री. दत्तात्रय हरी माने आपल्या निवेदनांत म्हणतातः—

" दारूबंदी अंमलांत येण्यापूर्वी मला दारूचें फार व्यसन होतें. तथापि दारूबंदीनंतर तें अजिबात सुटलें. त्यामुळें माझा शारीरिक आणि आर्थिक फायदा झाला. माझ्या घरगुती जीवनांतहि मी आतां सुखी आहे. मी दररोज सुमारे तीन ते चार रुपये मिळवितो. घरगुती कारणासाठीं खर्च करून माझ्या मिळकतींतून मी शेतीसाठीं खंडानें थोडी जमीन घेतली. तसेंच मी ३००-४०० रुपये बाजूस काढून ठेवले आहेत. सध्या मी एकटाच आहे. हें माझें निवेदन प्रसिद्ध करण्यास माझी मुळींच हरकत नाहीं. **इतकेंच नव्हे तर दारूबंदीच्या प्रचारार्थ माझें उर्वरित जीवन व्यतीत करण्याची माझी तयारी असल्यानें सरकारी खात्यांत योग्य अशी जागा मिळाल्यास दारूबंदीचा प्रचारक म्हणूनहि काम करण्याची माझी तयारी आहे.** "

थोडा हंसला, जणूं ही क्षुल्लक म्हातारी ताकत नसतांना आपल्याला कोणत्या रूपानें ऋणांतून मुक्त करणार ? या विचारानें कदाचित् त्याला हंसूं आलें असावें. म्हातारी पुढें म्हणाली.

" मीं कांचीपुरीची, या कांचीपुरींत ' मद्य ' नांवाचा एक द्रव पदार्थ फुलांपासून आणि फळांपासून बनवण्यांत येतो. साऱ्या भरतखंडांत कांचीपुरी शिवाय ही वस्तु होऊंच शकत नाहीं. तीच वस्तु मीं तुम्हांला बनवून देणार आहें. तुमची हरकत नसली तर मीं त्याची प्रयोगसिद्धता करीन. "

नरेंद्र राजाने या गोष्टीला हरकत घेतली नाहीं. स्वर्णसुंदरीला त्या बाबतींत कसलीच जाणीव नसल्यानें तिनेंही मावशीला, ऋणांतून उतराई होण्याच्या या गोष्टीला हरकत घेतली नाहीं.

म्हातारीनें भट्टी लावून प्रथम फळांच्या रसापासून अर्क काढून त्याचें मद्य तयार केलें आणि राजाला दिलें. तसली ती मादक वस्तु राजानें कधींहि यापूर्वी चाखली नसल्यानें राजाला त्यापासून निराळाच आनंद मिळूं लागला. हळूहळू या आनंदापासून कैफ निर्माण होऊं लागला. आणि थोड्याच दिवसांत मावशीशिवाय राजाचें पानहि हालेनासें झालें राजा शुद्धबुद्ध सारें कांहीं विसरला. राज्य विसरला, पत्नी विसरला, कल्पद्रुमीला विसरला, आईला विसरला आणि स्वर्ण-सुंदरीलाहि विसरला. राजमातेला वाईट वाटे, सुवर्णसुंदरीला वाईट वाटे; पण करतात काय ? म्हातारीनें राजाला पूर्णपणें मद्यांत बुडवून टाकलें होतें.

\+ • + +

आतां म्हातारीचें इच्छित कार्य पूर्ण होत आलें होतें. एक दिवशीं संधि साधून तिनें आपल्या गांठोड्यांतून ती कांचीपुरीहून आणलेली जालीम मद्याची कुपी काढून आपण तयार केलेल्या मद्यांत मिसळली आणि ते मद्य राजाला दिले. तें घेतांच राजाला कैफ चढला, त्याच्या अंगाचा दाह होऊं लागला. आणि वेड्यापिशा सारखा तो भुयाराच्या मार्गानें समुद्र किनाऱ्याकडे धांवत गेला.

जातांना 'कल्पद्रुमी' काढून अनवधानानें त्यानें मद्यपात्रांत ठेवून दिली. राजा तिकडून धांवत गेल्यावर, म्हातारीनें बोंब ठोकली. "राजा बेफाम होऊन समुद्राकडे गेला आहे. त्याला आवरा " तें ऐकतांच जवळच मांजराला कुरवाळत बसलेली राजाची आईहि तशीच मांजराला घेऊन भुयार मार्गानें समुद्र किनाऱ्याला धांवली. म्हातारीला तर ही सुवर्णसंधि आली होती. तिनें मद्यपात्रांतून ती ' कल्पद्रुमी ' मुद्रा काढून बोटांत घातली. धांवत जाऊन सज्जांत उभ्या असलेल्या स्वर्ण सुंदरीचा हात धरला आणि शेषाचें स्मरण करून ती म्हणाली " आतांच्या आतां आम्हां दोघांना कांचीपुरीच्या विषयमति राजासमोर उभें कर. " हें काय घडतें आहे हें स्वर्ण सुंदरीला कळलेंच नाहीं. एकंदर प्रसं-गानें ती दिङ्मूढ झाली. आणि तिनें आपले डोळे गच्च मिटून घेतले स्वर्ण सुंदरीनें जेव्हां मिटले डोळे उघडले तेव्हां आपण भलत्याच महालांत उभे असून समोरच एक विषयांध राजा हात पसरून आपल्याला जवळ बोलवीत असल्यानें तिला दिसलें. तिची मानलेली मावशीहि छद्मीपणानें हंसत तिथेंच उभी होती. म्हातारीनें आंगठी राजाच्या हातावर ठेवली आणि ती विषयमति राजाला म्हणाली " राजा आतां वेळ दवडूं नकोस ! तुला हवं तें या आंगठीजवळ माग. " राजाहि मोठा कपटी. त्यानें पहिल्या प्रथम शब्द उच्चारले

## अवघें सोंग —



ऐसे संत जाले कळीं । तोंडीं तमाखूची नळी
स्नानसंध्या बुडविली । पुढें भांग वोडवली ॥
भांग भुर्का हें साधन । पचनीं पडे मद्यपान ।
तुका म्हणे अवघें सोंग । तेथें कैंचा पांडुरंग

दुधाचे घागरीं मद्याचा हा बुंद ।
पडलिया शुद्ध नव्हे मग ॥

—तुकाराम

---

" निपाधापुरीची राखरांगोळी होवो " एवढे शब्द उच्चारून आपले बाहु पसरून तो स्वर्णसुंदरीच्या रोखानें निघाला. " ये, पति म्हणून माझा स्वीकार कर ! " विषयमति म्हणाला

तो जवळ येतांच किंचित् मागें सरून स्वर्णसुंदरी म्हणाली, " राजेश्वरा थांब. विधिलिखितच असे तर मी तुझी पत्नी होईनहि; परंतु मला एक महिन्याचा अवधी दे. कारण हा एक महिना मला दानकर्मांत घालवायचा असतो. तें माझें व्रत आहे. आणि एक महिना पुरा होतांच मी तुझ्या गळ्यांत माळ घालीन. " राजानें तिची विनवणी मानली. आणि सर्व व्यवस्था करायला प्रधानाला सांगून, दुसऱ्या एका राजवाड्यांत तिची खास व्यवस्था करून दिली. आणि त्या दिवसापासून स्वर्णसुंदरीनें राज्यांतल्या एक हजार भिकाऱ्यांना रोज पंचपक्वान्नाच्या अन्नाची सदावर्तें सुरू करून आपण व्रतस्थ राहिली. दयाशील अंतःकरणानें आपण करायला गेलें काय, आणि घडलें काय ? हीच एक टोंचणी तिच्या मनाला टोंचत राहिली.

राजा नरेंद्राची मात्र विलक्षण अवस्था झाली. तो सर्वस्व हरला होता. त्याच्या डोळ्यादेखत निपाधापुरीची राखरांगोळी झाली होती. शिल्लक राहिले होते ते तीन जीव. एक नरेंद्राची आई, स्वतः नरेंद्र आणि त्याचें तें लाडकें मांजर. अशा वेळीं हतबुद्धतेनें व्याकुळ झालेली नरेंद्राची आई नरेंद्राला म्हणाली, " बाबा नरेंद्रा, जें करूं नये तें तूं करून बसलास आणि जीवनाची राखरांगोळी केलीस. अरे, हें मद्य म्हणजे ही सुरा, देवांनीं देखील आपणाला पचणार नाहीं म्हणून ती दानवांना देऊन टाकली. तूं तिच्या आहारीं गेलास आणि जन्माचा जायबंदी मात्र झालास. [illegible] थोर थोर ऋषिमुनींनी हिला एक वेळ देखील हात [illegible] सत्यनाश

होईल असा शाप दिलेला आहे. आणि तुझी ही अवस्था म्हणजे त्या शापाचा तूं बळी आहेस ! असो जें झालें तें झालें; परंतु आतां धैर्य धरून पुन्हा असें करणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून ईश्वराची करुणा भाक ! ”

राजानें मातेचें तें अमृततुल्य बोलणें मुकाट्यानें ऐकलें. आणि त्या मांजराला घेऊन भिक्षा मागत गांवोगांव तो फिरायला लागला. आपलें गेलें वैभव आठवून त्याला मनस्ताप होई. स्वर्णसुंदरीला आठवून तो वेडापिसा होई; आत्महत्या करावी असें त्याला फार वाटे; परंतु आणखी दोन जिवानां त्याच्यावांचून कुणाचाच आधार नव्हता ते म्हणजे त्याची आई आणि त्याचें लाडकें मांजर. कुठें अन्न मिळे कुठें उपास घडे अशा परिस्थितींत भणंगपणें फिरत फिरत दैववशात राजा नरेंद्र कांचीपुरींत पोंचला. आपण कुठें आहोंत याची शुद्ध त्याला नव्हती. राजमहालाजवळ पंचपक्वान्नाची सदावर्त चालू आहे असें अन्य भिकाऱ्यांकडून कळतांक्षणींच थकल्या भागल्या आईला रस्त्याच्या एका कडेला बसवून तो राजमहालाकडे निघाला. पहिल्यांदा मिळालेली भिक्षा आणून त्यानें आईला दिली. आणि पुन्हा येऊन तो भिकाऱ्यांच्या रांगेंत उभा राहिला. त्याला पुन्हा आलेला पाहून राजाचे नोकर त्याला हांकलून द्यायला लागले. तो कांहीं जाईना, तेव्हां तिथें बरीच गडबड झाली. ती गडबड ऐकून स्वर्णसुंदरी बाहेर आली. तिनें नरेंद्राला भिकाऱ्यांच्या रांगेंत पाहिला आणि नोकराकरवीं त्याला आणखी भिक्षा घालायला आज्ञा केली. राजा नरेंद्राच्या बगलेंत असलेल्या मांजरानें स्वर्णसुंदरीला पाहिलें; परंतू विचारें करतें काय ? प्रसंग जाणून स्वस्थ राहिल्याखेरीज त्याला गत्यंतर नव्हतें.

मिळालेल्या भिक्षेच्या अर्धा हिस्सा मांजराला घालून नरेंद्र राजवाड्याच्या पाठच्या बाजूला उद्यानांत जिथें पाण्याचा झरा वाहात होता तिथें जाऊन खात बसला. झालेल्या श्रमाच्या ग्लानीनें तिथल्याच एका झाडाखालीं त्याला विसावा घ्यावासा वाटला म्हणून तो जरा आडवा होतो तोंच त्याला गाढ झोंप लागली.

मांजर मात्र त्याच्या उशाशीं राखवाली करीत बसलें. राजा जिथें झोंपला होता त्याच्या जरा अलीकडे राजमहालांतली बरीच खरकटी पडलेलीं होतीं. तिथल्या उष्ट्यावर ताव मारण्यांत बरेच उंदीर गर्क झाले होते. त्यांचा नायक कांहीं न करतां जवळच बैठक मारून बसला होता.. कांहीं उंदीर त्याला एकत्र केलेलीं पक्वान्नें नेऊन देत होते. मांजरानें अधिक वेळ लावला नाहीं. हळूंच जाऊन त्यानें त्या नायकावर झडप घातली आणि त्याला पकडून ठेवला. तो नायक उंदीर आपणाला सोडून देण्यासंबंधीं दीनवाणीनें मांजराची विनवणी करीत होता; परंतु मांजर कांहीं सोडीना. बाकीचे उंदीरहि त्या नायकासाठीं आपला जीव द्यायला तयार झाले. शेवटीं एका अटीवर त्याला सोडून द्यायला तें तयार झालें. मांजर म्हणालें, “ काय रे, इथला राजा या वेळीं काय करतो आहे ? ”

“ तो मद्याच्या कैफांत पार झिंगून पडला आहे ! ” नायक उंदीर म्हणाला.

“ मग असें कर, त्या राजाच्या अंतःपुरांत नागाचें चित्र असलेली एक वेगळीच दिसणारी आंगठी आहे. ती जर मला तुम्ही मिळवून आणून द्याल तरच मी याला सोडीन. नाहीं तर याची धडगत नाहीं. ” मांजर म्हणालें. सगळे उंदीर धांवत गेले. त्यांनीं ती आंगठी राजाच्या अंतःपुरांतून शोधून काढून त्या मांजराला आणून दिली. आणि मांजरानें त्या नायक उंदराला सोडून दिलें. मिळालेली आंगठी घेऊन तें मांजर नरेंद्राजवळ आलें त्यानें त्याला जागें करून ती आंगठी त्याला दाखविली.

‘ कल्पद्रुमी ’ हातांत येतांच पहिल्या प्रथम ती बोटांत घालून राजा नरेंद्रानें आई आणि स्वर्णसुंदरीसकट निषाधापुरीचें पुनर्वैभव मागितलें आणि त्यानंतर त्वेषानें तो उद्गारला “ सदैव मद्याच्या कैफांत लोळणाऱ्या आणि परस्त्रीची अभिलाषा करणाऱ्या कांचीपुरीची राखरांगोळी होवो ! ”

आपल्या महालांतल्या सुवर्णमंचकावर राजा नरेंद्र आपल्या उद्धारकर्त्या मांजराला कुरवाळीत बसला असतांना आई आणि स्वर्णसुंदरीकडे पाहून झाल्यागेल्या गोष्टीसंबंधी, आणि एक घोर संकट निरसन झाल्याबद्दलचे निःश्वास टाकून म्हणाला,

“ पाहिलेंस आई, कृतघ्नतेचा शेवटीं कसा पराजय होतो तें ? दयाशील अंतःकरणानें आम्हीं दोघानीं दोन प्राण्यावर जिवापाड प्रेम केलं. एकानें आम्हांला घोर संकटांतून सोडवलं, तर दुसऱ्यानें आम्हांला एका भयानक गर्तेत बुडवलं ! प्रेमाचं दान करतांना तें सत्पात्रीं आहे, कीं कुपात्रीं आहे, याचा विचार आधीं केला पाहिजे. जिव्हाळा अवश्य वाटावा; परंतु योग्यायोग्यतेचा विचार आधीं केला पाहिजे. सत्यापसत्याचा विचार न करतां मीं मावशीनें दिलेलें मादक अर्क प्यायलों, इभ्रतीला काळिमा फांसला, आणि त्या धुंदींत सारेंच विसरलों, सर्वस्व हरलों. योग्यवेळींच दैवानें हात दिला आणि आजचा हा सोन्याचा दिवस पाहिला ! ”

• • •

या महिन्यांतील
मुजऱ्याचें मानकरी

# डॉ. वसंतराव खानोलकर



विद्वान आणि व्यासंगी पुरुषांचा यथायोग्य गौरव करणें हें विद्यापीठाचें कार्य. पण मुंबई-सरकारनें १ मार्च १९६० रोजीं डॉ. वसंतराव खानोलकर यांच्यासारख्या आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या शास्त्रज्ञाची मुंबई विद्यापीठाचे उपकुलगुरु म्हणून नेमणूक करून एकापरीनें मुंबई विद्यापीठाचाच गौरव केला आहे.

सावंतवाडी संस्थानांतील मठ गांवचें खानोलकर घराणें. त्यांतील कर्तबगार माणसें केंद्यापर्यंत जाऊन पोंचली. वसंतरावांचे वडिल डॉ. रामजी खानोलकर हे केंद्रा येथें डॉक्टरीचा व्यवसाय करीत होते. तेथेंच १३ एप्रिल १८९५ रोजीं वसंतरावांचा जन्म झाला.

१९१० सालीं वसंतराव विद्यापीठाची प्रवेश-परीक्षा उत्तीर्ण झाले आणि त्यांनी मुंबईच्या विल्सन कॉलेजमध्यें आर्टस् विभागांत आपलें नांव दाखल केलें. लहानपणापासून त्यांचा वाङ्मयाकडे ओढा आणि त्यामुळें वडिलांच्या पावलावर पाऊल टाकण्याचें स्वप्नींहि नाहीं. पण वडिलांची तीव्र इच्छा कीं आपल्या मुलानें आपल्यापेक्षांहि नामवंत डॉक्टर व्हावें. शेवटीं वडिलांच्या इच्छेचा जय झाला आणि वसंतराव १९१३ सालीं विलायतेस उच्च शिक्षणाकरितां गेले. १९१६ सालीं ते लंडन विद्यापीठाची बी. एस्सी परीक्षा पहिल्या वर्गांत उत्तीर्ण झाले आणि या अपूर्व यशाबद्दल त्यांना 'ग्रॅहम रिसर्च' व 'फुलर्टन' शिष्यवृत्त्या मिळाल्या. त्यानंतर वसंतरावांना प्रो. अर्नेस्ट स्टर्लिंग आणि सर विल्यम बेलीस या आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या आणि नोबेल प्राईज मिळविणाऱ्या शास्त्रज्ञांचें मार्गदर्शन लाभलें आणि १९१८ सालीं लंडन-युनिव्हर्सिटीची एम्. डी. पदवी मिळवली.

१९२० सालीं त्यांची लंडन युनिव्हर्सिटींत रिसर्च फेलो म्हणून नेमणूक झाली. आणि हें काम करीत असतांना त्यांनीं डी. एस्सी. ही पदवी मिळविली.

१९२३ सालीं भारतांत परतल्यावर कॅन्सर-सारख्या रोगावर संशोधन करण्याचे विचार त्यांच्या मनांत घोळूं लागले. त्याचवेळीं त्यांची टाटांची गांठ पडली. त्यांनीं आपल्या मनांतील कॅन्सर संशोधनविषयक कल्पना टाटांच्यापुढें मांडल्या. त्या टाटांना पसंत पडून त्यांनीं वसंत-रावांना अमेरिकेंत उच्च शिक्षणासाठीं पाठविलें. तेथील शिक्षण आटपून परत येतांना त्यांनी डॉ. फुल आणि डॉ. कोहोन या दोन अमेरिकन शास्त्रज्ञांना भारतांत आणलें. त्यानंतर परळ येथें स्थापन झालेल्या टाटा मेमोरियल कॅन्सर हॉस्पीटल या संस्थेची स्थापना झाली. १९४१ ते १९५५ पर्यंतच्या काळांत ते या संस्थेच्या डायरेक्टर पदांवर होते.

१९४१ च्या पूर्वकाळांत ग्रँट मेडिकल कॉलेज आणि जी. एस्. मेडिकल कॉलेज या कॉलेजांत प्राध्यापक म्हणून काम करीत होतेच. १९४० ते १९४३ पर्यंत मुंबईच्या के. इ. एम्. हॉस्पीटलचे डीन म्हणूनहि त्यांनीं काम पाहिलें.

१९५५ पासून इंडियन कॅन्सर रिसर्च सेंटर या संस्थेचे प्रमुख म्हणून काम पाहूं लागले. कॅन्सर हा एक अत्यंत असाध्य असा रोग आहे आणि त्यावर विजय मिळविण्यासाठीं सर्व जागतिक शास्त्रज्ञ जंगजंग पछाडत आहेत. आणि त्या मोहीमेंतील डॉ. खानोलकरांची कामगिरी आघाडीच्या शिले-दाराला साजेशी अशीच आहे. या विषयावरील आंतरराष्ट्रीय शास्त्रज्ञांत डॉ. खानोलकरांना मानाचें स्थान दिलें जातें आणि त्यांच्या मताला फार मोठी किंमत दिली जाते. कॅन्सरवरील संशो-धन म्हणजे एक प्रकारें थोर मानवसेवा. आणि त्यामुळें १९५५ सालीं भारत सरकारनें वसंत-रावांना पद्मभूषण हा किताब देऊन त्यांचा यथोचित गौरव केला.

१९२३ सालीं डॉ. खानोलकरांनीं एका फ्रेंच स्त्रीशीं विवाह केला. त्यांची पत्नी, कन्या शकुंतला आणि पुत्र इव्हॅन्स हे फ्रान्समध्येंच स्थायिक झाले आहेत. वसंतराव फ्रेंच आणि जर्मन भाषा सफाईनें बोलतात. काव्य, चित्रकला आणि संगीत हे त्यांचे आवडीचे विषय आहेत. फावल्या वेळांत बागकाम करण्याचाहि त्यांना शोक आहे.

असा अबोल, पण रसिक, शालीन पण व्यासंगी शास्त्रज्ञ आज विद्यापीठाच्या उपकुल-गुरुपदीं विराजमान होत आहे या सुदैवाबद्दल मुंबई विद्यापीठाचें मनःपूर्वक अभिनंदन !

अनुक्रमणिका

# शेवटचें पान

दीपावलीचें हे शेवटचें पान वाचकांसाठींच राखून ठेवले आहे. दीपावलींत प्रसिद्ध होणाऱ्या मजकुरांबाबत वाचकांच्या काय प्रतिक्रिया आहेत हे जाणण्यासाठीं दीपावली सदैव उत्सुक आहे. पत्रें सुटसुटीत छोटीं असावींत. त्यांत वैयक्तिक गाऱ्हाणें नसावें. टोपण नांवाखाली कोणतेंच पत्र प्रसिद्ध होणार नाहीं.

---

## खास बायकांसाठीं एक अंक काढा

स. न.

मार्च महिन्याचा 'खास प्रौढ पुरुषांसाठीं' प्रसिद्ध केलेला अंक वाचला. प्रत्येक पुरुषानें विजयी मुद्रेनें आपल्या गरीब बिचाऱ्या बायकोला अगदीं खड्या स्वरांत वाचून दाखवावें असें भरगच्च विनोदी साहित्य प्रसिद्ध केल्याबद्दल प्रत्येक प्रौढ पुरुष आपलें अभिनंदनच करील. मी एक स्त्री असूनहि आमच्यासारख्या 'मेल्या बायकांची' निंदा वाचून या अंकाचें कौतुक केल्यावाचून राहावत नाहीं. अंकांतील 'स्वयंपाकघरांतील गोष्टी' (जुन्यांतलें सोनें) आंसवें व अरिष्टें श्री. सामंत) हे लेख फार आवडले. बायकांची निंदा वाचून संतापानें लालीलाल झालेल्या आम्हां स्त्रियांना शांत करणारें "बीवी की है......" हें सदर फारच आवडलें.

या प्रमाणें दीपावली 'खास स्त्रियांसाठीं' एखादा अंक का काढीत नाहीं ?

आपली नम्र

**रोज जयवंत कोठारे**

## जाहिरातीतील साहित्य येत नाही

स. न.

दीपावलीचा मी नियमित वाचक आहे. त्यामुळें खालील सूचना कराव्याशा वाटतात.

१ जूननंतर प्रत्येक अंकांतील दोष— जाहिरातींतील साहित्य कधींच येत नाहीं यासाठीं साहित्य ताब्यांत आल्याशिवाय जाहिरात करूं नये ).

२ काव्यविभागांत 'हातीं उरलें शून्यच केवळ' असे होतें.

३ 'आऊट ऑफ फॉर्म' अशा लेखकांना स्थान देऊं नये.

४ परिसंवादाची चूष आतां जीर्ण झाली. त्यांत नावीन्य आणावें हे दोष घालविण्याचा प्रयत्न करावा.

आपला

**मो. शं जोशी**, पेण

[ हातीं आल्याशिवाय दीपावली साहित्याची जाहिरात कधींच करीत नाहीं परंतु आयत्यावेळीं विशेष महत्त्वाचा मजकूर हातीं आला कीं जाहिरात केलेलें साहित्य नाईलाजानें मागें ठेवावें लागतें. तथापि असें घडूं नये याची जास्तींत जास्त काळजी घेण्यांत येते—संपादक ]

## पाणपोईकडे गांभीर्यानें पाहूं नका

स. न.

मार्चच्या अंकांत मोहना कोठारे यांचें प्रसिद्ध झालेले पत्र वाचलें. पाणपोईतील दीपावलीचा उल्लेख त्यांना खटकला हें वाचून वाईट वाटले. पाणपोईकडे इतक्या गंभीर दृष्टीनें पाहूं नये. तें पूर्ण खेळीमेळीचे सदर आहे. आपण मित्रमंडळींत बसलों असतांना सहज म्हणत नाहीं का कीं "माझ्यासारखा सज्जन उभ्या गांवांत आढळायचा नाहीं." हें त्या दृष्टीनें आपण ऐकतो, त्याच दृष्टीनें पाणपोईतील दीपावलीच्या स्तुतीकडे पहावें. अशी विनंती आहे.

आपला,

**वसंत सबनीस**

## उपेक्षिलेलें समाजकार्य

स. न. वि. वि.

दीपावलीचा मार्चचा अंक फार आवडला. विशेषतः शामराव ओक–पु. ल. देशपांडे यांचे लेख फार सुंदर आहेत. आणखी एका लेखाचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे आणि तो म्हणजे डॉ. दमयंती सरपटवार यांचा. स्त्रियांच्या लेखांत तोच एक लेख उठून दिसतो. त्यांचं आणखी साहित्य केव्हां प्रसिद्ध करणार ?

आणखी एक शंका : एप्रिलच्या दुसऱ्या आठवड्यांत मुंबई सरकारचा दारूबंदी सप्ताह असतो. एक उपेक्षिलेलें पण आवश्यक असें तें समाजकार्य आहे. दीपावलीनेंहि या कार्यास हातभार लावावा ही अपेक्षा.

आपला,

**दत्तात्रय सोमण**, वसई

## जत्रेंतील चित्रें

सा. न.

ग. दि. माडगूळकरांचीं जत्रेंतील चित्रें दीपावलींतून क्रमशः येतील अशी अपेक्षा होती. औंधाचा राजा रसिकांच्या अजून स्मरणांत आहे. माडगूळकरांनीं आपलें लिखाण मंदावलें कां हें कळत नाहीं. निदान वर्षारंभापासून तरी पुनरपि जत्रेंतील चित्रें दाखवावींत ही विनंति.

आ.

**राजा जगताप**, विलेपार्ले

---

मुद्रक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें.